# सावरकरांची कविता

विनायक दामोदर सावरकर

संपादक

वासुदेव गोविंद मायदेव

मूल्य सव्वादोन रुपये

# सावरकरांची कविता

विनायक दामोदर सावरकर

संपादक

वासुदेव गोविंद मायदेव




* १० *

मूल्य सव्वादोन रुपये

# प्रस्तावना

श्री. विनायक दामोदर सावरकर यांचें नांव न ऐकलेला महाराष्ट्रीय विरळा. मागच्या पिढीपैकीं पुष्कळांनीं जरी त्यांचें वक्तृत्व ऐकलें नसलें तरी त्यांनीं रचलेला तानाजीचा अथवा बाजीप्रभू देशपांडे यांचा पोवाडा एकाद्या गणेशोत्सवप्रसंगीं कुठें ना कुठें तरी ऐकला असेल. त्यांतील काव्य, भाषाप्रभुत्व व ओजस्विता पाहून त्यांनीं आनंदानें मानाही डोलवल्या असतील. या तेजस्वी पुरुषानें राष्ट्रीय कामगिरी-बरोबरच स्वदेशाभिमान स्फुरवणारी उत्तम कविता लिहून मराठी भाषेची मोठी सेवा केली आहे याची जाणीव मात्र त्या पिढींतल्या व अलीकडल्या पिढींतल्याही वाचकांस नसेल. श्री. विनायकराव सावरकरांच्या साठाव्या वाढदिवसाचे प्रसंगानें त्यांच्या कवितांचा संग्रह छापावा असें त्यांच्या कांहीं चहात्यांस वाटत होतें. त्याबद्दलची व्यवस्थाही कशी करावी हें ते पहात होते. इतक्यांत हें काम मींच करावें असें अगदीं अकल्पितपणें सुचविण्यांत आलें आणि विनायकराव सावरकर यांचेबद्दल माझे मनांत आदर असल्यामुळें व आधुनिक मराठी कवितेंत अशा पैलूच्या काव्याची भर जरूर पडावी असें मला वाटत असल्यामुळें सावरकरांच्या कवितेच्या संपादनाचें काम मीं माझ्या अंगावर घेतलें.

हें काम घेतलें खरें पण सावरकरांची कविता एकत्र सांपडणें किती अवघड होतें याची कल्पना मला त्यावेळेस नव्हती. त्यांच्या कांहीं भक्तांनीं त्यांच्या कांहीं कविता कुठें तरी, केव्हां तरी व जमतील तशा छापून टाकलेल्या; कांहीं कुणींतरी वह्यांतून उतरून घेतलेल्या; कांहीं कुणाजवळ तुकड्याताकड्यांवर आलेल्या व कांहीं तर कुणाला नुसत्या पाठ. अशा सर्व ठिकाणांहून या कविता गोळा करतां करतां माझे बरेच दिवस गेले. नंतर अशी गोळा केलेली कविता प्रथम विनायकरावांना दाखविली. त्यांच्याकडून तपासून ती बरोबर असल्याची

त्यांनीं खात्री दिल्यावर मग ती या संग्रहांत घेतली आहे. असें असून यांतील एकूण एक पाठ, लेखनस्थळ व लेखनकाल अगदीं निखालसपणें बिनचूक असतील अशी खात्री देणें कठिण; तथापि या सर्व गोष्टी बहुतांशीं बरोबर असाव्यात अशी निरनिराळ्या पुराव्यांवरून खात्री करून घेऊन मग छापलेल्य आहेत. प्रारंभींची व शेवटची या दोन कविता त्यांचें ध्येयसर्वस्व व नम्रता दर्शविण्या-साठीं कालानुक्रम धरून घातलेल्या नाहींत. निश्चित पुरावा मिळत नसल्यामुळें कांहीं कवितांखालीं स्थल व काल दिलेले नाहींत. बाकी सर्व कविता कालानुक्रमानें घातल्या आहेत. त्यावरून विनायकरावांचें मन, काव्यप्रभुत्व व रसिकता यांचा होत जाणारा विकास आपोआप वाचकाचे ध्यानांत येईल. भावी काळांत समग्र सावरकरकविता एकत्र छापण्याचा स्तुत्य उद्योग एकाद्या उत्साही संपादकानें केला व त्याला ही माहिती थोडीबहुत उपयोगी पडली तरी या परिश्रमांचें चीज झाल्यासारखें होईल.

मराठींत स्वदेशाभिमानपर कविता थोडी आहे. परंतु जी काय आहे त्यांत अत्युच्च स्थान मिळविण्याचा मान विनायकरावांच्या कवितेकडे जातो. स्वदेशाभिमानपर कविता हे शब्द ऐकतांच कांहीं लोक नाकें मुरडतील हें मी जाणून आहें. आज-कालच्या जगांत स्वदेशाभिमानाला फारशी किंमत नाहीं; भाव नाहीं. भाव नसण्याचें कारण राष्ट्रराष्ट्रांत चाललेलें पाशवी युद्ध होय. स्वदेशाभिमानाचा परिपोष करतां करतां दुसऱ्यांचा स्वातंत्र्यापहार करण्याची दुर्बुद्धि कांहीं राष्ट्रांना होते. तीं दुसऱ्यांच्या जीवांवर उठतात आणि माणसे, पैसा व काळ यांचा बिनदिक्कत नाश करतात. हें पाहिल्यामुळेंच पृथ्वीवरच्या सर्व राष्ट्रांत बंधुभाव असावा, शांतता नांदावी, कलह नसावे, अशा शांतताप्रिय व विश्वबंधुत्ववादी विचारसरणीकडे माणसें वळतात. हें विश्वबंधुत्व हितकारी असलें तरी तें अमूर्त अवस्थेंतून मूर्त अवस्थेंत आणणें किती कठिण आहे याची जाणीव विचारी माणसाला तेव्हांच येईल.

मनुष्य म्हटला कीं तो आपलीं मुलें माणसें, आपले नातेवाईक, आपले गांवकरी, आपले प्रांतांत राहणारे, आपली भाषा बोलणारे, आपला धर्म आचरणारे, आपली संस्कृति राखणारे लोकांसच जवळचे मानणार. बरें, हें स्वाभाविकही आहे. व्यक्तीला, जमातीला अगर जातीला राष्ट्राचे घटकांत सन्मानानें व अभिमानानें जगतां येतें. तसेंच राष्ट्राला राष्ट्रसंघांत सन्मानानें व अभिमानानें जगतां येईल. राष्ट्राच्या

कल्पनेनंतरच राष्ट्रसंघाची—विश्वबंधुतेची कल्पना. तेव्हां विश्वबंधुत्वाच्या विराट्र व उदात्त कल्पनेची बूज नीट पटेतों, केवळ स्वतःपुरती दृष्टि न ठेवणारा, आपले आजूबाजूस सहानुभूतीनें पहाणारा, आपले राष्ट्रांतील बांधवांचीं सुखदुःखें ओळखणारा, त्यांची काळजी वाहणारा व त्यांबद्दल जागरूक असणारा मनुष्य श्रेष्ठ आहे हें कोणासही पटण्याजोगें आहे व अशा मनुष्यांत आढळणारा हा स्वदेशाभिमानाचा गुण ओघानेंच उच्च प्रकारचा आहे हेंही तो कबूल करील. या दृष्टीनें पहातां श्री. सावरकरांच्या कवितेंत राष्ट्रीय वृत्तीच्या, स्वातंत्र्यभक्तीच्या व स्वदेशाभिमानाच्या भावना हेलावत आहेत हें पाहून मराठी वाचक तरी निःसंशय आनंदित होईल.

ज्या लोकांत, ज्या देशांत व ज्या धर्मात आपण जन्म घेतों त्याबद्दल आदर वाटणें स्वाभाविक आहे हें वर सांगितलेंच आहे. पण त्यांतच जर ते लोक, तो देश व तो धर्म अभिमान वाटण्याजोग्या स्त्रीपुरुषांनीं, त्यांच्या आचारविचारांनीं व सस्मरणीय प्रसंगांनीं पुनीत झाला असला तर हा आदर जास्तच योग्य आहे हें उघड आहे. अशा तऱ्हेच्या आपल्या थोर लोकांवर, देशावर व धर्मावर आपत्ति कोसळून त्यांचें तेज लुप्त होऊन, त्यांचें विस्मरण पडून, अज्ञानही प्रसृत झालें असलें तर त्याबद्दल कोणत्याही सुजाण माणसाला विषाद वाटल्यावांचून रहाणार नाहीं. पण बहुजनसमाजांतील पुष्कळ व्यक्तींना याचें ज्ञान नसतें, भान नसतें. भावनावान् व ज्ञानी व्यक्तीला मात्र हें पाहून स्वस्थ बसणें अशक्य होतें व त्यामुळेंच राष्ट्रीय कवनाची उत्पत्ति होते. राष्ट्र जिवंत व स्वतंत्र असतांना ज्या तेजानें तळपत असतें, ज्या गुणांनीं मंडित दिसतें व ज्या पराक्रमी स्त्री-पुरुषांच्या अचाट, अतुल, व धाडसी स्वार्थत्यागानें तगलेलें आढळतें त्या गोष्टी गाण्याची राष्ट्रीय कवीला स्फूर्ति होते व त्यामुळेंच राष्ट्रीय अगर स्वदेशाभिमानपर कविता निर्माण होते.

अशा तऱ्हेची स्वदेशाभिमानपर कविता मराठींत तरी प्रथम स्वजनांची हीन स्थिति पाहून त्यांस जागें करण्याकरितां रामदासांच्या स्फुट कवनांत व नंतर मराठेशाहींतील वीरांचे पराक्रम गाण्याकरितां शाहिरांनीं रचलेल्या पोवाड्यांत अवतरलेली दिसते.

स्वदेशाभिमानपर कवितेंत स्वदेशाबद्दलचा अभिमान निरनिराळ्या भावनांनीं व्यक्तविला जाणें शक्य आहे. कांहीं वेळेस ही स्वदेशाभिमानपर कविता

लिहिणारास स्वतःची व आपले सभोंवतालचे लोकांची हतबलता, निष्क्रियता व उदासीनता करून विषादाचे अगर उद्वेगाचे रूपानें अवतरेल; कांहीं वेळां ती पूर्व वैभवाची, शूर पूर्वजांची व कर्तृत्वगार वीरांची स्मृति होऊन आशावादाचे रूपानें प्रकट होईल; कांहीं वेळां छलकांबद्दल राग उत्पन्न होऊन ती चीड व्यक्त करील; कांहीं वेळां मायभूमीपासून दुरावल्यानें विवासित स्थलकाळांत हळहळ वाटून ती तळमळेल; कांहीं वेळां ती बलिदानास उद्युक्त करील; कांहीं वेळां बलिदानांत रसरसेल व कांहीं वेळां तर बलिदानानें कृतार्थही होईल. परंतु या सर्व भावनांचे मुळाशीं देशावरची प्रीति, देशाचें स्वातंत्र्य व देशाचा गौरव अगर उद्धार असल्यामुळें ती कविता एका उन्नत अशा राष्ट्रभावनेचा परिपोष करण्याकडे परिणत होते सावरकरांच्या कवितेचीं कोणतींही दोनचार पानें चाळून पाहिलीं तर त्यांत या देशोद्धारपर भावनांचा उल्लेख आलेला नाहीं असें होणार नाहीं.

सावरकरांच्या कवितेचे साधारणपणें चार खंड पडतात. पहिला १८९३ ते १९०२; दुसरा १९०३–१९१२; तिसरा १९१३ ते १९२४ व शेवटचा १९२४ ते आतांपर्यंतचा. पहिल्या कालखंडांतील कवितांकडे नजर टाकली तर त्यांची या काळांतील कविता पुस्तीसारखी आहे. ते फटके, लावण्या, पदें, पोवाडे, संस्कृत वृत्तें, आर्या, लिहून पहात होते. त्यांनीं भाषांतरही करून पाहिलें. या धडपडीमुळें त्यांनी लेखनांत किती प्रगति केली हें १९०२ सालांतील कविता वाचून लक्षांत येईल. दुसऱ्या कालखंडांतील कवितांत ह्या नमुन्याकडे पाहून लिहीत बसण्याचा स्वभाव कमी होत जाऊन मिळवलेल्या प्रभुत्वानें आपली भावना रसाळ व रसरशीत तऱ्हेनें कशी मांडली जाईल एवढेंच ते पाहात असावेत असे दिसतें. दुर्दम्य उत्साह, विलक्षण आत्मविश्वास, अचाट धैर्य व अतुल निर्भयता त्या वेळच्या कवनांतून व्यक्त झाली आहे. त्या भावनांची खळबळ योजलेल्या शब्दांनीं मनावर इतकी उमटते कीं, त्यापुढें कवितेंतील बाह्यांगाकडे वाचकाचें लक्षच जात नाहीं व तो कवितेच्या अंतरंगानें बेभान होतो. या काळांतील त्यांच्या कवितेचें रूप साधे आहे, सोपें आहे, सुंदर आहे, ओजस्वी आहे, उदात्त आहे. तिसऱ्या कालखंडांतील कवितांचें स्वरूप हुतात्म्याचें गांभीर्य, जबाबदारी व लोकोत्तरता प्रकटवणारें झालें आहे. कल्पनेचा खेळकर विलास जरी या वेळच्याही कवितांत क्वचित् दृग्गोचर झाला तरी यावेळची त्यांची बहुतेक कविता एकाद्या अनुभवी, गंभीर, तत्त्वचिंतक योग्यास साजेशी वाटते. १९२४ च्या नंतरची कविता मात्र

प्रचारावर नजर ठेवून लिहिल्यामुळें आधींच्या कालखंडांतील कवितेहून वेगळ्या स्वरूपाची आहे.

त्यांच्या उपलब्ध कवितेची बरीच बिनचूक अशी गणती केली आहे व ती कविताक्रमानंतर दिली आहे. त्यावरून ती दहा हजार ओळींहून अधिक आहे हें वाचकांचे ध्यानीं येईल.

विनायकरावांनीं स्वागतार्थ श्लोक लिहिले, तमासगीरांसाठीं लावण्या लिहिल्या, मेळ्यासाठीं पदें, फटके व पोवाडे लिहिले. पंतांचे थाटावर गंगावकिलीप्रमाणें गोदा-वकिली लिहिली. मेघदूताचे धर्तीवर आकांक्षा काव्य लिहिलें. एकाद्या आख्यानाप्रमाणें कमलेची काव्यकथा लिहिली. विरहोच्छ्वास लिहिले. आपलेकडील महाकाव्याच्या कल्पनेप्रमाणें एक महाकाव्य लिहिण्याचा संकल्प करून त्या महाकाव्याचीं कमला, महासागर व गोमांतक यांसारखीं उपाख्यानें, आख्यानें व पर्वें लिहिलीं. असे भावना प्रकट करण्याकरितां निरनिराळे काव्याचे नमुने त्यांनीं हाताळून पाहिले. या सर्व नमुन्यांत पोवाडे लिहिण्यांत त्यांचा विक्रम आहे.

सावरकरांच्या काव्यरत्नाकराचीं रूपें सागराच्या रूपाप्रमाणे विविध प्रकारचीं आढळतात. सागर शांत असतां स्वच्छ, आनंदी व खेळकर दिसतो. त्यानें जरा कठोर रूप धारण करतांच तो गढूळ, गंभीर व खोल भासतो. पण तो कराल होतांच बेताल अथांग व काळासारखा वाटतो. सावरकरांची कविता अशींच विविध रूपें धारण करते. ती कांहीं वेळ तरल कल्पनातरंगांत रमते, कांहीं वेळां ती रोखठोक वीर-भावनांत बलशाली दिसते व कांहीं वेळां तर ती भरवतांडवनृत्य करतांना आढळते. या सर्व प्रकारचीं उदाहरणें वाचकांस या कवितासंग्रहांत सांपडतील.

कवि परचित्तप्रवेश करून निरनिराळ्या भावनांवर लिहूं शकतो याबद्दल कुणालाही शंका नाहीं. स्थानबद्ध, विवसित व वेळीं तुरुंगांतून सश्रम सजा भोगत असलेल्या देशभक्तांचे मनांत उसळणारे उद्वेग, भावना, आशा, आकांक्षा कवीला त्याचा प्रत्यक्ष अनुभव नसूनही मांडतां येतील. पण विनायकरावांनीं या सर्व अवस्था स्वतःच अनुभविल्या असल्यामुळें त्या भावना किती जिवंत चितारलेल्या आहेत हें त्यांच्या कविता वाचूनच कळेल. कारावासांत कांहीं कारणानें पडल्या-वर कांहीं तरी आवडीच्या विषयावर उत्तम ग्रथलेखन केलेल्या विभूतींना कमी लेखण्याचा माझा मुळींच हेतु नाहीं. परंतु स्वदेशभक्तीपायींच कारागृहांत

पडून, तेथील यातना भोगीत असतांना, हालांत पिचत असूनही हतबलता झुगारून, दुर्दम्य आशावादानें आपली देशोद्धाराची तळमळ रात्रंदिवस मनोमंदिरांत तेवत ठेवून त्याकरितांच आपली काव्यशक्ति खर्च करणारे कविशार्दूल इतर राष्ट्रांतूनही आतांपर्यंत फार थोडे आढळतील. ही गोष्ट लक्षांत आल्यावर वाचक त्यांची जरा कठिण वाटणारी कविता वेळीं थोडे कष्ट घेऊनही वाचतील अशी मला आशा आहे.

सावरकरांचे काव्याच्या संपादनास प्रारंभ करतांच त्यांच्या स्फुट काव्यांचेंच प्रकाशन विशेषतः व्हावयास हवें आहे असें मला दिसून आलें. त्याप्रमाणें मीं जमवाजमव केली. यापूर्वी 'रानफुलें' नांवाच्या सावरकरांच्या कवितासंग्रहांत कमला, सप्तर्षि, विरहोच्छ्वास, मूर्ति दुजी ती व मरणोन्मुख शय्येवर हीं दीर्घ कवनें आणि 'कुसुमसंचय' नांवाच्या लहान संग्रहांत आकांक्षा व महासागर हीं काव्यें संपूर्ण छापलीं होतीं. या संग्रहांत त्यांतील मूर्ति दुजी ती, आकांक्षा व मरणोन्मुख शय्येवर हीं काव्यें अत्यंत आत्मपर असल्यामुळें मीं पुन्हा घेतलीं आहेत. तसेंच सप्तर्षीमधील एकलकोंडी, कमलेंतील फुलबाग, विरहोच्छ्वास व महासागर यांतील कांहीं छेदक व गोमांतकांतील अटकेवरील जरीपटका हे भाग विनायकरावांची वर्णनशैली, कल्पनाविलास व भावोत्कटता उत्कर्षानें दर्शविणारे असल्यामुळें मुद्दाम अंतर्भूत केले आहेत. ते संदर्भविरहित वाचले तरी वाचकांस स्फुट कवनाप्रमाणेंच वाटतील असा भरंवसा आहे. कांहीं कवितांचे आरंभीं सूचक परिचय दिले आहेत, आणि कांहीं कठिण कवितांवर दीर्घ परिचयही परिशिष्टांत दिले आहेत. वाचकांनीं हें परिशिष्ट नजरेखालीं घालावें.

सावरकर-कविता वाचतांना वाचकांस याहूनही अधिक मदत लागली तर मींच संपादन केलेल्या व याच वेळेस प्रसिद्ध होत असलेल्या सावरकर-काव्यसमालोचन या पुस्तकाचा उपयोग होईल व त्याचा उपयोग करून घ्यावा असे मी नम्रपणें सुचवितों.

आतां एकच गोष्ट राहिली ती म्हणजे या पुस्तकाच्या संपादनकार्यांत ज्यांची ज्यांची मदत झाली त्यांचे आभार मानण्याची. रा. स. गं. मालशे या उत्साही तरुणानें विनायकरावांचे कवितेच्या मला लागतील तितक्या प्रति करून दिल्या. रा. केशव भिकाजी ढवळे हे माझ्या उत्साहाचा भंग होऊं न देण्यासाठीं प्रकाशनार्थ पुढें सरसावले. आर्यभूषणचे व्यवस्थापक रा. वि. ह. बर्वे यांनीं त्यांचें जुनें

गिऱ्हाईक असलेल्या मला कागदपुरवठा व छपाई सोयीनें करून दिली. सावरकर-चरित्रकार रा. शि. ल. करंदीकर यांनीं सावरकरांच्या कांहीं कविता मिळवून दिल्या व कवितांचे लेखनकाल ठरविण्यांत मदत केली. माझ्या वाङ्मयीन साहसांत माझ्या पाठीशीं सदैव असलेले माझे मित्र हरि सखाराम गोखले हे तर गेले कांहीं महिने माझेबरोबर सारखे कष्ट करीत होते. या सर्वांची मदत नसती तर ही कविता माझे हातून कशी संपादन झाली असती ? या सर्वांचा मी अत्यंत आभारी आहें.

पण सर्वांत जास्त आभार जर कुणाचे मानावयास हवे असतील तर ते खुद्द विनायकरावांचेच. वडिलकी, अधिकार, मोठेपणा बाजूला ठेवून, मोकळेपणानें कवितांबद्दल चर्चा करून, तुकडे कपटे शोधून, स्मृतीला ताण देऊन, वेळीं जागरण करूनही त्यांनीं आपली कविता नीट छापण्याजोगी करून दिली त्याबद्दल त्यांचे मी आभार मानतों.

स्वदेशाच्या प्रेमानें रसरसलेलीं हीं कवनें संपादित करतांना मला तर आनंद झालाच आहे. पण तसा आनंद ही कविता वाचणाऱ्यांसही झाल्याचें मला ऐकूं आलें तर माझा आनंद निःसंशय द्विगुणित होईल.

पुणें, २८ मे, १९४३ **वा. गो. मायदेव**

# सावरकरांची कविता

प्रस्तुत काव्यसंग्रह म्हणजे राष्ट्रीय विचारांचें मूलधनच होय, म्हणून प्रत्येक राष्ट्रभक्तानें तें आपल्या संग्रहीं ठेवणें इष्ट होय. स्वातंत्र्यवीरांच्या जीवनांतील ही विचारसंपदा आपणास खचित स्फूर्तिदायक व मार्गदर्शक होईल. सावरकरांच्या आंतरिक ध्येयप्रवण जीवनाचें यथार्थ दर्शन प्रस्तुत काव्यसंग्रहांत पाहावयास सापडेल. स्वातंत्र्यवीरांचीं स्वातंत्र्यगीतें तर पुन्हा पुन्हा वाचावींशीं वाटतात; कारण ध्येयवादी जीवनाच्या सर्व छटा त्यांच्या कवितेंत वाचकांवर मोहिनी घालतात.

सावरकरांच्या कवितांनीं मराठी वाङ्मयास राष्ट्रीय विचारांचें नवीन वळण लावल्याची साक्ष प्रस्तुत काव्यसंग्रहावरून पटेल. प्रस्तुत संग्रहानें सावरकरांना युगप्रवर्तक कवीचा मान मिळवून दिला आहे. सावरकरांची कविता हा मराठी वाङ्मयाला लाभलेला एक अमोल ठेवा आहे.

"सर्व प्रचलित काव्यप्रकार श्री. सावरकरांनीं हाताळलेले असून भिन्न भिन्न रुचींच्या लोकांना ते सारखेच आवडतील. या सर्व प्रकारांनीं या संग्रहाला प्रातिनिधिक स्वरूप प्राप्त झालें आहे."

—मनोहर

"त्यांचीं स्फुटकवनें जगाच्या वाङ्मयाचीं लेणीं शोभावींत, अशा योग्यतेचीं आहेत."

—महाराष्ट्र, नागपूर

# सावरकर–काव्य–समालोचन

**[ सावरकर काव्यवाङ्मयाची मीमांसा करणाऱ्या तेरा लेखांचा संग्रह ]**

संपादक

## वासुदेव गोविंद मायदेव

सावरकरांच्या काव्यवाङ्मयाचें यथार्थ दर्शन घडवून आणणारा हा समालोचनात्मक लेखसंग्रह म्हणजे त्यांच्या काव्यसंग्रहाला पूरकच होय. सावरकरांच्या कवितेचें विविध दृष्टिकोनांतून केलेलं हें तौलनिक परीक्षण केवळ हृदयंगमच नव्हे, तर विचारांना चालना देणारेंही आहे. प्रस्तुत संग्रहांत असलेले कसलेल्या चिकित्सकांचे लेख म्हणजे वाचकांस बौद्धिक मेजवानीच वाटेल. हें समालोचन मार्मिक असून विविधतेनें नटलेलें आहे. ह्या लेखसंग्रहांतील लेखक हे अभ्यासी असल्यामुळें त्यांनीं अधिकारवाणीनें सावरकरांच्या काव्याची चर्चा व चिकित्सा केलेली आहे. प्रस्तुत समालोचनात्मक ग्रंथानें मराठी वाङ्मयांत महत्त्वाची भर घातलेली आहे.

सावरकर काव्यवाङ्मयाची मीमांसा करणारा हा लेखसंग्रह सावरकरांच्या काव्यभक्तांना जितका उपयुक्त भासेल, तितकाच तो एकंदर मराठी काव्याच्या सर्वसाधारण अभ्यासकालाही उपयुक्त वाटेल यांत संशय नाहीं.

× × ×

" 'समालोचनाला' एकप्रकारें काव्यसमीक्षा ग्रंथाचें स्वरूप प्राप्त झालें आहे."

—विविधवृत्त २६–९–४३

पृष्ठें १९७ मूल्य २ रुपये

# सावरकरांचा काव्यसंभार

| नांव | ओळी |
|---|---|
| सावरकरांची कविता | ३८९५ |
| गोमांतक | ४८१२ |
| कमला | ८७२ |
| सप्तर्षि | ५१४ |
| विरहोच्छ्वास | ४४४ |
| महासागर | ५३२ |

सावरकरांची कविता या पुस्तकांत गोमांतक, कमला, सप्तर्षि, विरहोच्छ्वास व महासागर या काव्यांतून अनुक्रमें २९१, ११८, ३२, ७० व ७० ओळी घेतल्या आहेत. वरील ३८९५ मधून या ५८१ ओळी वजा करतां सावरकरांचा एकंदर काव्यसंभार १०४८८ ओळींचा आहे.

---

# अनुक्रम

---

# सावरकरांची कविता



## १ स्वतंत्रतेचें स्तोत्र

[ चाल : चंद्रकांत राजाची०

जयोऽस्तु ते श्रीमहन्मंगले ! शिवास्पदे शुभदे
स्वतंत्रते भगवति ! त्वामहं यशोयुतां वंदे ॥ ध्रु० ॥

राष्ट्राचें चैतन्य मूर्त तूं नीति-संपदांची
स्वतंत्रते भगवति ! श्रीमती राज्ञी तूं त्यांची

परवशतेच्या नभांत तूंची आकाशीं होशी
स्वतंत्रते भगवती ! चांदणी चमचम लखलखशी

गालावरच्या कुसुमीं किंवा कुसुमांच्या गालीं
स्वतंत्रते भगवती ! तूंच जी विलसतसे लाली

तूं सूर्याचें तेज उदधिचें गांभीर्यहि तूंची
स्वतंत्रते भगवती ! अन्यथा ग्रहणें नष्ट तेंची

मोक्ष मुक्ति हीं तुझींच रूपें तुलाच वेदांती
स्वतंत्रते भगवती ! योगिजन परब्रह्म वदती

---

१ सूर्याचें तेज ग्रहणांत दिसेनासें होतें. आणि समुद्राची थोरवीही अगस्ति-ग्रहणांत–अंजलींत हस्तगत होतांच–विलुप्त झाली.

जें जें उत्तम उदात्त उन्नत महन्मधुर तें तें
स्वतंत्रते भगवती ! सर्व तव सहचारी होतें

हे अधम-रक्त-रंजिते । सुजन-पूजिते । श्रीस्वतंत्रते

तुजसाठिं मरण तें जनन
तुजवीण जनन तें मरण
तुज सकल चराचर शरण

भरतभूमिला दृढालिंगना कधिं देशिल वरदे
स्वतंत्रते भगवति ! त्वामहं यशोयुतां वंदे १

हिमालयाच्या हिमसौधाचा लोभ शंकराला
क्रीडा तेथें करण्याचा कां तुला वीट आला ?

होय आरसा अप्सरसांना सरसें करण्याला
सुधाधवल जान्हवीस्रोत तो कां गे त्वां त्यजिला ?

स्वतंत्रते ! या सुवर्णभूमिंत कमती काय तुला ?
कोहिनूरचें पुष्प रोज घे ताजें वेणीला

ही सकल-श्री-संयुता । आमुची माता । भारती असतां

कां तुवा ढकलुनी दिधली ?
पूर्वीची ममता सरली
परक्यांची दासी झाली

जीव तळमळे, कां तूं त्यजिलें उत्तर याचें दे ?
स्वतंत्रते भगवति ! त्वांमहं यशोयुतां वंदे २

पुणें १९०३

## २ श्रीमंत सवाई माधवरावांचा रंग

[ फटका

धन्य कुलामधिं धनी सवाई भाग्य धन्यची रायाचें
सेवक हातीं यशस्वि असती पुण्य किती त्या पायांचें

श्रीमंतांचे भाग्यप्रतापें द्वादश वर्षें बहु श्रमले
अटकेला यश पटका रोंविति पुन्हां सर्वजण चट नमले

रजपूतादी शूर रिपूही श्रीमंतांसी शरण अले
मोंगलपतिंनीं प्रसन्न होउनि वजिरपदासी अर्पियलें

जिकडे तिकडे नाम पेशवे काळ शत्रुसी वाटुनियां
प्रजेंत झाली बहू शांतता रिपू सर्व हे हटूनियां

नाच शिकारी रंग तमाशे प्रजेंत होती नित्य पहा
श्रीमंतांनीं बेत ठरविला रंग करावा असा महा १०

रायाचा कल पाहुनि सर्वहि देती सत्वर रूकारा
हर्ष होतसे वर्षप्रतिपदे पुण्यांत झाला पूकारा

सरकारांनीं सरदारांनीं सकलजनांनीं दों रस्तीं
रंग करोनी ठिकठिकाणिंही केलि सुशोभित ती वस्ती

पागे पथके मानकरी अणि कारभारि हे सरदारा
श्रीमंत प्रभु माधवरायासहीत आले दरबारा

जिंहीं रोविला महाप्रतापें जरिपटक्याला अटकेला
महादजीची स्वारी आली सरकारांना न्यायाला

हत्ती घोडे फौज असा हा समाज सर्वचि मीळाला
आज्ञा केली श्रीमंतें मग सुरुवात करा खेळाला २०

उडूं लागले गुलाल पल्ले हौद खपविले फौजेनें
रंगाचे, किति खेळुन स्वारी वाड्यामध्यें मौजेनें

नंतर स्वारी तिसरे प्रहरीं निघालि शहरीं थाटानें
वाडा डावा घालुन गेली बुधवाराचे वाटेनें

पुढें विलसते मुख्य स्वारी लवें थाट अंबाऱ्यांचा
चंद्रबिंब श्रीमंत अवांतर प्रकाश पडला ताऱ्यांचा

पिचकाऱ्यांचा मार जाहला फार तेधवां बुधवारीं
स्वारी कापडआळींतूनी खेळत आली रविवारीं

हरिपंताचे वाड्यापाशीं रंग केशरी उडवुनियां
स्वारी गेली नागझरींतुन रंग केशरी तुडवुनियां ३०

रास्ते यांचे पेठेमध्यें पाट लागले रस्त्यांनीं
गच्च्यांवरुनी बंब लावुनी रंग उडविला रास्त्यांनीं

सलाम मुजरे सर्व राहिले दंग जाहले रंगांनीं
द्वापारिं जसे रंग करविले भगवान श्रीरंगांनीं

शहरिं भिजविले कैक बंगले चौक गुलालें रंगांनीं
द्वापारिं जसे वृंद भिजविले भगवान श्रीरंगांनीं

झुकत झुकत समुदाय चालती स्वारी ये मग वानवडी
नंतर रंगा अरंभ झाला नाच होउनी दोन घडी

लाखों हौदे उडूं लागले पिचकाऱ्यांचा मार अती
झालि रे झाली गर्दी एकचि वर्णावी ती पहा किती ४०

दों दों हातीं गुलाल भरती लाल छत दिसे बुंदांत
हास्यवदन मग राव शोभती शूर शिपाईवृंदांत

नंतर ऐसा रंग खेळुनी उठले स्नानाला जाया
अगणित त्या क्षणिं तापुं लागल्या सुगंधि पाण्याच्या कढया

वेगवेगळीं सुगंध तेलें रायाला लावायाला
उभे राहिले ब्राह्मण घेउनि घालायातें न्हायाला

अवर्णनियशा थाटानें कीं झालीं सर्वांचीं स्नानें
सर्वांसी मग वांटुनि दिधलीं अनंत वस्त्रें शिंद्यानें

नवीं लेवुनी वस्त्रें पुनरपि येति सर्वही दरबारा
नाच जाहला सुरू होउनी पानसुपारी हारतुरा ५०

मग शिंद्यांनीं श्रीमंतांना शिरपेंच तुरा अर्पियले
तसेंच सर्वां जनांस देखा अमोल पोशाखा दिधलें

सूर्यबिंब लज्जीत होइसें हिलाल लावुनि मग रात्रीं
उलटी परते स्वारी सर्वहि संगें नानादी मंत्री

शोभा बघती नरनारीगण चिराकदानें लावुनियां
गजरानें अति स्वारी येती वाड्यामध्यें घेउनियां

भगूर, १८९४

## ३ स्वदेशीचा फटका

[ फटका

आर्यबंधु हो उठा उठा कां मठासारखे नटा सदा
हटा सोडुनी कटा करूं या म्लेंच्छपटां ना धरूं कदा
काश्मीराच्या शाली त्यजुनी अलपाकाला कां भुलतां
मलमल त्यजुनी वलवल चित्तीं हलहलके पट कां वरितां ?
राजमहेंद्री चीट त्यजोनी विटकें चिट तें कां घेतां
दैवें मिळतां वाटि इच्छितां नरोटि नाहीं का आतां ?
नागपूरचें रेशिम भासे तागपटासें परि परक्या
रद्द बनाती मद्द लोक हो मऊ लागती तुम्हां कश्या ?
येवलि सोडुन पितांबरांना विजार करण्या सटिन पहा
बेजारचि तुम्हि नटावयामधिं विचार करतो कोणि न हा    १०
केलि अनास्था तुम्हीची स्वतः मग अर्थातचि कला बुडे
गेलें धनची नेलें हरुनी मेलां तुम्हि तरि कोण रडे ?
अरे अपणची पूर्वी होतों सकल कलांची खाण अहा
भरतभूमिच्या कुशीं दीप ते कलंक आतां अम्ही पहा.
जगभर भरुनी उरला होता नुरला आतां व्यापार
सकलही कलाभिज्ञ तेधवां अज्ञ अतां आम्ही थोर
निर्मियली मयसभा अम्हिच्चिना पांडव किरिटी अठवा रे
मद्द लोक हो लाज कांहिंतरि ? लद्द असुनि शठ बनलों रे
आम्रफलाच्या कोईमध्यें धोतरजोडा वसे तदा
होते जेथें प्रतिभ्रह्मेची, धिक् अम्हि जन्मुनि अपवादा    २०

हे परके हरकामीं खुलविति भुलविति वरवर वाचेनें
व्यवहारी रित असे बराबर सदा हरामी वृत्तीनें

कामधेनुका भरतभूमिका असुनि भाग कां ती भिक्षा ?
सहस्र कोसांवरुनी खासा पैका हरतो प्रभुदीक्षा

नेउनि कच्चा माल आमुचा देती साचा पक्क रुपें
आमच्यावरी पोट भरी परि थोरि कशाची तरी खपे

पहा तयांची हीच रीत हो मिती नसे त्या लबाडिला
नाना कर्मे नाना वर्मे देश असा हा लुबाडिला

निमुळीं हातांमधलीं फडकीं फडकत नाना ध्वज वरतीं
हडेलहप्पी करुनि शिपाई निघत सवारी जगभर ती ३०

नानापरिचे रंग भरीती रंगपुष्प तें दंग करी
मोर कावळे पारवे ससे श्वापद विचरति तीं बकरीं

राजगृहें गोपुरें झळकती मजले सजले त्यामधुनी
सुंदर नारी दु:खहर्षभरिं त्या बघती शोभा तरुणी

नाना जाती पिकली शेती गार हीरवें वस्त्र धरी
भात बाजरी गहूं गाजरी आच्छादिलि ही भूमि बरी

अगनग गेले गगन चुंबण्या सवें थोर बहु कोरांकी
भास पुरुपची निजांकिं बसवी स्वानंदानें पोरां कीं

नाना ऐसीं विचित्र चित्रें दाविति तुम्हां भुलधंदा
तुम्हीहि भुलतां बघतां घेतां क्षणांत स्वपटाला निंदा ४०

याला आतां उपाय बरवा एकी करवा मन भरवा
ओतप्रोत अभिमानें हरवा देशी धंदे पट धरवा

परके वरवर कितीहि बोलति गोडगोड तरि मनिं समजा
सुंदर म्यानीं असे असिलता घातचि होइल झट उमजा

रावबाजि जरि गाजि जहाले राज्यबुडाऊ तरि मुख्य
सख्य असें परक्यांचें यांचें गोष्ट हृदयिं ही धरुं लख्ख

वैर टाकुं या यास्तव लवकर खैर करो परमेश्वर ती
निश्चय झाला मागें अपुला परदेशि पटें ना धरुं तीं

चलाचला जाउं या घेउं या देशि पटांला पटापटा
जाडेंभरडें गडे कसेंही असो सेवुं परि झटाझटा ५०

ना स्पर्शूं त्या पशूपटाला मऊ वर, विखारचि भावूं
घेऊं खडतर अंतीं सुखकर धर्मचि मानुनियां जाऊं

आजवरी जरि भुललों खुललों तत्कपटाला अविचारें
जाउं द्या चला गतगोष्टींचें स्मरणची नको हेंचि बरें

द्रव्यखाणि ही खोरें घेउनि परकीं पोरें खणती रे
एकचित्त या करूं गड्यांनो वित्त जिंकुं तें पुनरपि रे

विश्वेश्वरि ती नारायणि ही यमहरिहर अदि सुरवरिणी
कर्मसिद्धिसी दावो नेउनि मोद देति निजभक्तजनीं

दर अज्ञानी रजनी जावो सांग प्रकाशो रवि थोर
वरावयाला रत्नपटाला करो आर्य ते रण घोर ६०

कवितारूपी माला अर्पी आर्य बुधांला सार्थक हा
भक्तांकरवीं मन देवासी सेवायासी अर्पण हा

नाशिक, १८९८

## ४ गेला अहो देश रसातळाला !

[ इंद्रवज्रा

गेला अहो देश रसातळाला
स्वातंत्र्यप्रासाद अहा जळाला
आला परांचा अति थोर घाला
व्हा सज्ज, तुम्हांस लुटूं निघाला १

विध्वंसुनी कुंपण हा रिघाला
घालावयाला पर टोळ घाला
स्वातंत्र्यराशीस लुटून नेला
मेल्यापरी काय बसून ठेलां ? २

## ५ नाशकाजवळचीं लेणीं पाहून !

[ श्लोक

लेणीं बघाया मग पांडवांचीं
गेलों वयस्यांसह मौज साची
अत्यंत रम्य स्थळ पाहतां तें
संतोष झाला बहु मन्मनातें १

परंतु जातां क्षण हर्ष गेला
शोकानलें दाह मनांत केला
कीं थोर विद्वान् पितरां अशांला
कुपुत्र झालों अम्हि हे कशाला ? २

## ६ सायंकाळीं रानांत चुकलेलें कोकरूं

[ चाल—नृपममता रामावरती सारखी

कां भटकसि येथें बोलें । कां नेत्र जाहले ओले
   कोणिं कां तुला दुखवीलें । सांग रे

धनि तुझा क्रूर कीं भारी । का माता रागें भरली
   का तुझ्यापासुनी चुकली । सांग रे

हा हाय कोंकरूं बच्चडें । किति बें बें करुनी अरडें
   उचलोनि घेतलें कडे । गोजिरें

कां तडफड आतां करिसी । मीं कडे घेतलें तुजसी
   चल गृहीं चैन मग खाशी । ऐक रे

मी क्रूर तुला का वाटे । हृदय हें म्हणुनि का फाटे
   भय नको तुला हें खोटें । ऐक रे

हा चंद्र रम्य जरि आहे । मध्यान रात्रिमधिं पाहे
   वृक वारुनि रक्षिल ना हें । जाण रे

तो दूर दिसतसे कोण । टपतसे क्रूर बघ यवन
   गोजिरी कापण्या मान । जाण रे

कमि कांहिं न तुजलागोनी । मी तुला दूध पाजोनी
   ही रात्र गृहीं ठेवोनी । पुढति रे

उदईक येथ तव माता । आणीक कळपिं तव पाता
   देईन तयांचे हातां । तुजसि रे

मग थोपटुनी म्यां हातें । आणिलें गृहातें त्यातें
   तों नवल मंडळींना तें । जाहलें

कुरवाळिति कोणी त्यातें । अणि घेति चुंबना कुणि ते
   कुणि अरसिक मजला हंसते । जाहले

गोजिरें कोंकरूं काळें । नउ दहा दिनांचें सगळें
मउमऊ केश ते कुरळे । शोभले

लाडक्या कां असा भीसी । मी तत्पर तव सेवेसी
कोंवळी मेथि ना खासी । कां बरें

बघ येथें तुझियासाठीं । आणिली दुधाची वाटी
परि थेंब असा ना चाटी । कां बरें

तव माता क्षणभर चुकली । म्हणुनि का तनू तव सुकली
माझीही माता नेली । यमकरें

भेटेल उद्यां तव तुजला । मिळणार न परि मम मजला
कल्पांतकाळ जरि आला । हाय रे

मिथ्या हा सर्व पसारा । हा व्याप नश्वरचि सारा
ममताही करिते मारा । वरति रे

ह्या जगीं दुःखमय सारें । हीं बांधव पत्नी पोरें
म्हणुनियां शांतमन हो रे । तूं त्वरें

तरि कांहिं न जेव्हां खाई । धरुनियां उग्रता कांहीं
उचटिलें तोंड मीं पाही । चिमुकलें

हळु दूध थोडकें प्यालें । मग त्वरें तोंड फिरवीलें
कोंकरूं बावरुन गेलें । साजिरें

स्वातंत्र्य जयांचें गेलें । परक्यांचे बंदी झाले
त्रिभुवनीं सुख न त्यां कसलें । कीं खरें

लटकून छातिशीं निजलें ! तासही भरभर गेले
विश्व हें मुदित मग केलें । रविकरें

घेउनी परत त्या हातीं । कुरवाळित वरचेवरती
कालच्या ठिकाणावरती । सोडिलें

तों माता त्याची होती । शोधीत दूर शिशुसाठीं
दगडांचे तरुंचे पाठीं । हाय रे

हंबरडे ऐकूं आले । आनंदसिंधु ऊसळले
स्तनिं शरासारखें घुसलें । किति त्वरें

डोलतो मुदित तरुवर तो । सप्रेम पक्षि हा गातो
तोकडा प्रतिध्वनि देतो । मुदभरें

हे प्रभो हर्षविसि यासी । परि मला रडत बसवीसी
मम माता कां लपवीसी । अजुनि रे

नाशिक, १९००

## ७ नारोशंकराचें देवाळय

[ शार्दूलविक्रीडित

दिल्लीचें पद हालवोनि वरिली तेजें जिहीं संपदा
राहोनी निरपेक्ष वाहुनि दिली श्रीशंभुच्या सं–पदां
होते ते तुमचे सुपूर्वज असे यत्कीर्तितें ना लय
नारोशंकरचें असें कथितसे आम्हांसि देवालय

नाशिक, १९००

## ८ गोदातटीं रात्रीं

[ आर्या

गंगातीरीं बिंबित दीपशिखा नचि परंतु कज्जळ तें
सज्जनहृदय असेंची त्यजुनी दोषा गुणाकडे वळतें

नाशिक, १९००

## ९ श्रीटिळकस्तवन

[आर्या

लाजविलेंसि निज यशें धवलें त्वां सत्य हिमनगा तिलका
संतत जनपदसेवार्पित तूं तुज कवि न गान गातिल कां ?

अनलस जनकार्यातें आर्यातें रक्षि शंभु टिळकातें
शुक्लेंदुयशें लज्जित तेथें होतील ना कुटिल कां ते ?

स्वार्थास्तव ना केलें दुष्कृतिमंडन कदापि तिलकानें
यत्कीर्तिश्रवणामृत दुर्लभ सज्जन सदा पितिल कानें

जनसेवेस्तव झटतां झट कारीं नेति बाल तिलकाला
दुःसह छल सोसावा लागे या आर्यभालतिलकाला

परि धीर धरी केसरि, सरि पार्था ना शरासनचि टाकी
कीं " केसरी " सरीं जें पात्रत्व न तें " सरास " नचि टांकीं ?

दृढ स्नेह असे जो जो राष्ट्रहितोद्युक्त त्यांशिं तिलकांचा
राष्ट्रविघातक अरिच्या होती केसरिपुढें शिथिल कांचा

प्रेमा ठेविति साधू इहलोकीं, देवता नभीं, तिलकीं
यमदूत स्पर्शाया राष्ट्रहितेच्छू सतां न भीतिल कीं

देवा तुझ्या हवालीं केला हा कीर्तिनीतिचा ठेवा
व्हा वाली, स्तेनभयापासुनि या रक्षुनी सुखें ठेवा

गातो आर्यातें श्रीमयुरेशस्फूर्तिनें " विनायक " तो
नायक तो जगताचा तिलकस्तवनास मुदित आयकतो

नाशिक, १९००

## १० केतकरप्रशस्ति

**परिचय**—नाशिकचे लो. टिळकांचे व्याही आणि सन्मान्य पुढारी कै. गंगाधरपंत यांच्या स्मृत्यर्थ नगरगृह बांधण्यांत आलें, त्या केतकर–नगर–गृहाचा पाया घालण्यासाठीं न्यायमूर्ति माधवराव रानडे आले होते. त्यावेळीं विनायकरावांनीं पुढील श्लोक लिहिले.

[ शार्दूलविक्रीडित

सत्कीर्ती विमला वरूनि रमला, जो मातृभूला भला
औदार्यें भरला भवास तरला सत्पुत्र तो शोभला
देशार्थ श्रमला कधीं न दमला त्या सद्यशो-मंदिला
श्रीमत्केतकरा स्वभूहितकरा साष्टांग म्यां वंदिला १

ना कोणा छळिलें कुशब्द वदुनी सत्प्रेम तें जोडिलें
ज्यानें देशहितार्थ यत्न करण्या स्वार्थाप्रती सोडिलें
व्यापोनी नगरां पुरांस पसरे यत्कीर्ति देशावरी
हा हा निर्दय काल ने झडकरी गंगाधरा सत्वरी २

आधीं देशहितार्थ यत्न करिती ऐसे किती जन्मती
त्यामाजी परतंत्र देश अमुचा कुंठीत जेथें मती
ऐशाही समयीं कसें हरिसि बा या देश-उद्धारका
आर्यांचे कलिजे कसे हिसडसी, दीनांवरी मार कां? ३

ज्यांच्या सत्कृति थोर थोर करिती त्यांची वसावी स्मृती
साधूंचीं करितातिं यास्तव जनीं हीं स्मारकें सन्मती
आजी नाशिकवासि केतकर जो दैवें अम्हां लाभला
त्याचा स्मारकयोग हा जुळतसे आनंद झाला भला ४

बांधावें नगरगृहासि ठरलें पाया तया घालण्या
येती ' जस्टिस ' रानडे झडकरी मानोनि बोलावण्या
थोरांचे स्तवनार्थ थोरचि भले आम्हांसि याकारणें
झालें दर्शन साधुचें फिटतसे या चक्षुचें पारणें. ५

नाशिक, १९००

## ११ छंद नसे चांगला !

**परिचय**–ही लावणी एका तमासगीर फडास करून दिल्यापैकीं आहे.

[ चाल–' वृषपर्व्याशीं युद्ध चाललें '

स्त्री : मन्मन-मित्राच्या कासारा गणिकेचा हा तुला
गड्या रे छंद नसे चांगला

पति : अगे काय करूं गे मन मोही सुंदरी

स्त्री : जिवलगा असे परि रम्यमुखी ती दरी
भुलुन रहाल जरि इज शेजारीं काळ-सिंह क्षोभला
घेइल प्राण दाबुनी गळा ? १

पति : प्रेमें घाली कंठीं हस्ता नखरे करते किती

स्त्री : नव्हे ती नडंग नखें मारिती
जर खिसा खुळखुळे म्हणेल तरि मग बसा
ना तरी ढुंकुनी पाहिल ना अवदसा

पति : मजविरहित ती, सुभगा ठेवित प्रेमभाव ना भला

स्त्री : नव्हे ती लक्ष्मीहुनि चंचला २

पति : मम पद घेउनि हळूच चुरते मृदुहस्तें कोमला
कशी ती ठकविल सुंदरि मला

स्त्री : खायास मिळेल न कवडीही तुज जईं
पडशील सडुनियां, हंसेल जग हें तईं
पदमर्दन तें दूरचि राहो पैशास्तव प्रियकरा
ओढिल बाजारीं फरफरा !

नाशिक, १९००

१ अस्वल

## १२ लेडी ऑफ दि लेक : सर्ग ५ भाषांतर

**परिचय**—इंग्रजी सहाव्या इयत्तेंत असतांना विनायकरावांनीं पहिल्या सहा छेदकांचें भाषांतर केलें. तें पुढें दिलें आहे.

[ श्लोक

पुरा ज्या दिशासुंदरी पूर्व वी तो
प्रवासी जनांला सदा हर्षवीतो
करी जो स्मितें तामसी रम्य रेखा
प्रकाशे जलपृष्ठिं कीं रौप्य देखा

गिरीचेवरी घोर मार्गास दावी
जयाची प्रभा शुभ्र भारी वदावी
अशा बालरश्मीपरी संगराच्या
असंख्यात अभ्रांतुनी संकटांच्या

महावीर धर्मस्वकांतिप्रसारा
तसा दीप्त भारी सुशीलत्व तारा
प्रकाशोत कीं शुभ्रसे सर्वदा ते
भयीं लुब्धता, धाडसीं गर्व दाते

२

किरण शुभ्र प्रदीप्त अशापरी
तरुंतुनी झळके वरचेवरी
चमक लाल दिसे जइं ईक्षणीं
उठति सत्वर वीर तये क्षणीं

नयन लावुनि चित्रित अंबरीं
जपति वीर प्रभातस्तुती बरी
करुनि सत्वर सिद्ध हुताशना
उरकिती झट वीर युताशना

तनुस ‘ गेल ’ झगा मग वेष्टितो
रमवि रम्य विचित्रित दृष्टि तो
वचनपालक चालत मोहरीं
हरित रान ऋमी करडे गिरी

निबिड मार्ग कुठें चढती कडे
उभट दुस्तर चालति वांकडे
तळप्रदेश मनोहर पाहती
वळणिं ‘ फोर्थ ’ ‘ सुटीथ ’ प्रवाहती

करसहायिं हरीखति सत्वरीं
पद अशा चढणी वरचेवरी
दंवसरी गळती तरुचे तलां
प्रविशतां इतुका पथ गुंतला

दंव न मौक्तिक लाजवितें सवें
सकल ना परि सुंदरि-आंसवें

३

ज्या ठायीं उतरे सरोवर तिरीं घोर स्वरूपा भली
पंक्तीचे वरि पंक्ति लागति जिच्या ‘ बेन्लेडि ’ ती शोभली
‘ व्हेनाकार ’ धरोनियां रजतभा भ्रान्ती मनोहारि तें
जेथें ते स्थलिं पावती उभयतां सत्कीर्तिचे हार ते

घेतो खिंडित थेट मार्ग वळसे यन्मस्तकां झांकिती
मोठाले सुळके शिळा लटकती भीतिप्रदा त्या किती
वाफे ‘ ब्रॅकन ’ चेहि गार हिरवे ते शोभती सुंदर
स्पर्धेनें झुडपासमान चढतां डोले कुठें ‘ हीदर ’

ऐसा उंच सखोल हा नगपती घे फाटकासा झगा
फोफावोनि पुनः पुन्हा जल चिरी मार्गास त्या त्या नगा
होता आक्रमिण्या असा बिकट तो कीं आखडोनी गती
त्या घाटांतुनि मार्गदर्शक हळू पान्थास ने संगती

बोले ' काय विचित्र कारण तुम्हां रानांत या यावया
कोणी जेथ शके न रॉडरिकच्या आज्ञेविना जावया ? '

४

' रेकटीं लटकतो परवाना
त्याविना मज दुजी परवा ना
यद्यपी गमलि सत्यचि नाहीं
कीं तिची मज जरूर जराही

चूकलों करित मी मृगये तों
आज वासर तिचा जइं येतो
शांत निश्चल गमे मज सारें
कीं नगावरिल बर्फ-पसारे

दूर स्वामि तव भीम मनाचा
शीघ्र संभव न आगमनाचा
मार्गदर्शक मला वदला हें
जें कदाचित असत्यहि आहे '

' कां पुन्हा परि भयांत घुसावें ? '
' वीर तूं ? मजसि काय पुसावें
आम्हि राहुनि स्वतंत्र बसावें
कीं सुदाससम बद्ध असावें ?

शांत वेळ दिन आज रिकामा
घालवूं धरति या जरि कामा
कारणें बहुत क्षुल्लकशाही
वीर पावति स्थलांत कशाही
विश्वकद्रु, खग हिंडुनि घेतो
रान; त्याप्रतिचि धुंडुं निघे तो
अद्रिवासिनि सुरम्य कुमारी
नेत्रसायक तया जरि मारी
कीं भयाण पथ आक्रमिण्यातें
रे भयत्वचि भटां भुलवीतें '
पान्थ त्या वदत सत्तविवाणी
पाणिदार चतुरा अशि वाणी

५

' वद न वच ' असों दे गौप्य, नाहींच हेका
परि परिससि येतां तूं न कांहींच हें का ?
करित वरि सवारी मार ' अल्पाइनाचे ' ?
' मुळिं न मजसि ठावें आण माझीच साचें
नरपतिमृगयेतें पाळण्या सज्ज सेना
असति म्हणुनि ठावें एक, बाकी असेना
जमति नगनिवासी ऐकतां तप्त जात्या
फडकतिल पताका शांतिनें सुप्त ज्या त्या '
' फडकवुत सुखें त्या ना मना कामना ते
कसर कुरतडों त्यां, नाचि शंका मनातें
फडकतिल सवेंची चुंबण्या अंबरातें
धरुनि नगनिवासी वृक्षयुक्तांबरातें

म्हणसि चुकुनि आलों शांत हेतू मनातें
अरिसम परि देसी बोल अल्पाइनातें ’
‘ तव पतिविषयीं कीं दांड तो चंड ठावें
नृपतिवरिच बंडा मांडुनी जो उठावे

नृपप्रतिनिधिच्याही सन्मुखीं लाजला जो
नचि, करि अमिराचा खून ज्या लाज लाजो
जरि अणखि न ठावें वर्ततो तो कसा रे
विटतिल सुमनें, हें ऐकतां एक सारें

६

आरोप ऐकुनि असा अति नीच क्षोभे
तो ‘ गेल ’ मूर्त प्रलयाग्नि असाच शोभे
ओढोनि ऊर्ध्व भुवई वदला तयातें
‘ सिंहास हाणुन बळें मृग लात यातें

जीवंत मत्त सुटणार न, शीरजोरें
निंदोनिया दुखविलें न उशीर जों रे
तोंची शिरे तदुदरीं तरवार त्याची
मेल्याविना बघ न खोड जिरे जित्याची

हो रान राजगृह वा न कथा तयाची
प्रत्यक्ष हे सुरसभाहि विधातयाची
घायास शासन जिथें उपमर्द होतो
कोणासही डगमगेल न मर्द हो तो

‘ होताच तो जुलुम यद्यपि पादशाही
दंडी न स्वातिक्रमकारकशी दशा ही

दुर्गांत बालनृप तो बलहीन साचा
कोठील मान मग त्यास मुळीं न साचा

मंत्री सुदुर्बल करीं धरि राजदंडा
त्या दांडग्यास मग कोण करील दंडा
वाटे तुझें मन सवें बघुनी विटावें
रोमांच ह्या तव प्रतिकृतिनें उठावे

जो क्षेत्रकार जन दुर्बल नागवाया
धान्यें गुरें हिसकुनी बहु भागवाया
निष्कारणें सुजन दक्षिणवासियातें
निःशंक लाज शकली न शिवूंहि यातें '

नाशिक, १९००

## १३ श्रीशिवगीत

[ आर्या

नेती धर्म लयातें छळिती गो-द्विजवरां यवनकर ते
श्रीशंकर शिवरूपें धर्माचें जाहले अवन करते
सच्छीला, सद्वृत्ता मानिति सीतेसमा शिवा जीतें
ती श्रीजिजा जनुस दे आर्यजनधराहिता शिवाजीतें

धन्य यवनतम-हर्ता धन्यचि तज्जनक श्रीशहाजि रवी
हरवी रिपुकरिवर-मद रग यवनांची नरेश हा जिरवी

श्रीमद्भारत रामायण रम्य कथा-सुधा सदा पीतो
श्रीरामकृष्णसा मग अधमां, रक्षुनि बुधांस, दापीतो

धन्या जिजा वदे ती कथिते शिवबा तुला सुजननीति
कीं सोनार सुवर्णा दे[1] देवत्वा मुला सुजननी ती

अतितर दुस्तर बा हें मानुष्य तशांत उच्चकुलजनन
तरि वरिं सत्कीर्ति, हिला साधिति जे सुज्ञ धन, दुकुल जन न

भवसागर उतराया सुतराया, दे स्वधर्म ही सुतरी
तरि धर्म-छलक अधमां दंडुनि तूं भूमिभार हा उतरीं

जी जनु देउनि रक्षण भरण करी इच्छि आपणां शिव बा
ती मायभूमि मुक्त-क्लेशा हो, करिंच ह्या पणा शिवबा

सांप्रत बारे सारें यवनमयचि जाहलें भरतखंड
तन्नाश-उक्तकार्यीं पाडुं नको, हो उदंड रत, खंड

करिं मुक्त मायभूतें, निर्दय हो, जाळ धर्मलडातें
चिरणेंच उक्त जेथें पोसावें काय त्या गलंडातें

बहु काय वदों रक्षीं साधुस, हो नित्य कार्य-अनलस रे
काय यवनतृण खाया मागें मग आर्यशौर्य-अनल सरे

शिवराजहृदयसुघटीं बोधामृत ओतिलें जिजाईनें
कीं आम्रवन सुगंधें भरलें सुमनें करोनि जाईनें

घेउनि पिता सुतातें यवनपतिकडे विजापुरा गेला
यवनास नमन न रुचे, बैसे तैसाचि वीर रागेला

राजसभारीति नसे ठावी यातें, वदे शैहा[2], परते
घेउनि सुता वदत जो स्वगत अहह, छळति देश हा पर ते

---

१ दीपक अलंकार. २ शहाजी.

राय शहाजी बोधी कर यवनाराधना शिवाजीतें
मेळविलें केवळ म्यां तत्प्रेमें ह्या धनाशि वाजीतें

सोडीं यवनद्वेषा, जोडीं तत्प्रेमहेम हितकर बा
हा पिंड तयांचा, त्यां अर्पुनि यश धवल हें महिंत कर बा

विश्वासघात नरकचि त्याचा जो अन्न देइ गा परिस
स्वामिद्रोही म्हणती अधमाधम सुज्ञ पन्नगापरिस

गेलें भान शिवाचें कोमलसे गाल जाहले ओले
बोले बाल मधेंची तात, कुठें तेज आपलें गेलें?

गोद्विज कष्टविती हे नष्ट कराया स्वभूमिला सजले
स्वामी स्वामी त्यातें वदण्यातें वदन हें कसें धजलें?

हरहर खर पर चिरती चरचर दररोज वासरें गाया
खाया आर्यरविपुढें, काय यवन-काजवा सरे गा या

लुटिलें सर्वस्व जिहीं स्पर्शूं जो मायभगिनिला सजला
ताता तुम्ही सांगा वंदूं मी अधम काय तो? मजला

मरण वरिन, ना जाइन शरण म्हणुनि दास दुष्ट अधमातें
न लगे धन गज हय मज प्रिय जगतीं एक यवनवध मातें

नाशिक, १९००

## १४ गोदावकिली

**परिचय**—नाशिकला प्लेग असल्यामुळें विनायकराव आपले मामांचे येथें कोठूर गांवीं गेले होते. तेथें पंतांचे गंगावकिलीप्रमाणें गोदावकिली लिहिण्याचें त्यांचे मनांत आलें. गोदेच्या घाटावर बसून त्या गांवच्या लोकांविषयीं त्यांनीं ही कविता लिहिली आहे.

[आर्या

धवले धन्ये गोदे सन्मुनिवरसंघवेष्टिते गंगे
संगें तव तों अतितर दुस्तर भवसिंधु सत्वरें भंगे

आजवरी बाह्यांगा न्हाणिति माता न अंतरंगातें
श्रीसांब-शिरा खालें साधाया कार्य येत गंगा तें

घाट न हे पाट स्वयें मांडुनि न्हाणावया अम्हां लोकां
स्वांगीं पसरवि खेळवि जगजननी दे अवर्णनिय तोखां[1]

पळतां केव्हां येते धांवत धरण्या फुगोनि रागानें
केव्हां खडकीं बैसुनि मोहवि काढोनि सुस्वरा गानें

विकासित कमलें दावुनि न्हाइल पहिला तया मिळेल वदे
ऐशा परोपरीनें चुचकारुनि माय ही सदा शिव दे

पूजापेक्षित ऐशा भूमितालिं अनंत देवता वसती
स्वशिशुसमावनकीर्ती तुजसम अयि! तूंचि गे दुजी न सती

परि अल्पबुद्धि बालक जननी प्रार्थित तुझ्या पदा हा कीं
कौस्तुभवासि[2] जनांच्या योगक्षेमासि तूं सदा हांकीं

सांप्रत सर्वचि झालें माते, हें भरतखंड हीन खरें
परवशता बहु दुःसह बरवीं हृदयस्थ नंडगिचीं[3] नखरें[4]

---

१ संतोषांला. २ कोठूर गांवाचें नांव. ३ अस्वलीचीं. ४ नखें.

तत्तारणा झटावे सदये, संतत समस्त गांवकरी
गांव जुटीनें उठला तरि तदहित केंवि दुष्ट राव करी ?

मम मातुलकुलज जननि, तारीं सारे त्वरें मनोहर[1] ते
होउत तद्वंशज कृति[2] सत्कृतिनें संतजन-मनोहर ते

गंगे, संकटकालीं द्यावा त्या डोंगर्‍यां[3] सदा थारा
तत्सद्वंशज शुचि सति पत्निसहित वृद्ध भाउ उद्धारा

तद्वंशज अण्णांना तात्यांना तेंवि शंकरा बाला
रक्षीं, सांग तयांच्या गेहीं सिद्धिस विशंक राबाला

करिं जननि, यशस्वी ते संतत गोपाळराव बिवलकर[4]
वैद्यक-क्रियेंत मिळवी हटकुन ज्यांचा यशास धवल कर

बहु उग्र ग्रंथिरोगें मजसम आले पळून भयसहित
सन्मान्य श्रुतिज्ञ महाशब्दे ते वैद्य होतें[5] भयरहित

कानिटकर-बंधुत्रय पावन, दे भक्तिरुचिरसा कर गे
तद्वंशवृद्धि होउनि येवो जनवदनिं रुचिर साकर गे

गुरुजीचे सद्गुणरसिं जावोत गुणज्ञ नित्य तरतरुनी
विद्या परीक्षकास्तव जशि तरुणास्तव समुत्सुका तरुणी

नचि विसरावे माते, उद्योगी ते समस्त कुलकरणी
ग्रामजनांचे वदनीं राहो तद्रुचिरकृत्य-ललकरणी

यत्पूर्वजें मिळविलें गांव जहागिर प्रभूरतें बरवें
सन्मति स्वभूमिप्रेमा देउनि तारा समस्त ते बरवे[6]

---

१ मनोहर ते—मनोहर कुटुंबांतील लोक. गोविंदराव मनोहर हे विनायकरावांचे सख्खे मामा. २ धन्य. ३ डोंगरे नांवाचे कुटुंबांतील लोक. ४ डॉ. बिवलकर. ५ होवोत. ६ बरवे—हे कोठूरचे जहागिरदार. पेशव्यांशीं यांचे व्याहीपणाचे संबंध झालेले असून यांचे पूर्वज दिल्लीपर्यंत अधिकारी पदावर येत असत.

होती सुभगा भारति देवी स्वातंत्र्यशालु वापरित
त्याच्याच चिंधड्या या अभिमानें जपुनि ठेविं त्या त्वरित

कोणे काळीं धाडिल प्रभु कोणी तुणविणार[1] कुशल जरी
उपयोगी ह्या पडतिल जरि जपुनि सतेज ठेवुं त्यांस तरी

अपसांतिल कलह मिटो, निष्कारण व्यर्थ डौल समुळ तुटो
विघ्नांचें ऊर फुटो, सत्कुल हें कीर्तिसंपदेस लुटो

तव भक्त शुद्ध बरवे[2] श्रीगंगे साप्त तार भाऊ ते
भवसर्पदंशनाशक प्रभुभक्ति बरा उतार भाऊ[3] ते

ते रामभाउ बरवे संरक्षीं पत्निसहित सकलांना
प्रिय दामोदर त्यांचा वाटो सुखकर निवास सु-कलांना

जननी, सकलत्र तशा दादांना प्रेमदृष्टिनें पाळा
यश विभव तयां द्यावें रक्षावें गानकुशल गोपाळा

होवो गणपति तो कुलदीपक पावोनि उत्तमा शिक्षा
दे माते, त्या संतत देशोद्धारार्थ योग्यशी दीक्षा

सुज्ञ सुशिक्षित नाना तद्बंधु विनायकासि रक्षावें
भक्षावें किल्मिष; तिहिं देशहितातें सदैव लक्षावें

पात्र करावें गंगे, सद्गतिदानार्थ बापुंना साचें
मुक्त करीं सदये कीं भयकर बहु पाप ना पुन्हा सांचे

---

१ फाटलेल्या वस्त्रांत सुतें भरून तें पूर्ववत् धड करणारा. याच जहागिरी संघटित करणारा कोणी निघाल्यास स्वातंत्र्यसंपादनास उपयोगी पडतील हा भाव. २ अण्णाराव बर्वे-कोठूरचे बाणेदार वृद्ध जहागीरदार. यांच्या एकुलत्या एक चिरंजीवास व पुतण्यास पुढें कटाचे आरोपावरून शिक्षा झाल्या. पण हे डगमगले नाहींत. ३ मानोत.

ख्यात पित्यासम केशव सुधि हरि गोपाळ बाळ भागवत
राहो सुदृढ सुविद्यारत देशहितार्थ दक्ष भागवत

चिंताकानन जाळुन अण्णांना जननि गे सदा शिव दे
कर दीर्घायु यशस्वी सात तयां दास हें पदाशि वदे

मजला मम सन्मित्रां संरक्षा वासुदेव-तात्यांना[1]
मजसम वरदा व्हावी सद्विद्या आशु देवता त्यांना

दे वर अम्हां असा कीं ह्या हस्तें देश-शत्रु दंडावे
उद्धार त्रिवर्गसवें तो आधिं असें अम्हीं न तंडावें

सन्मित्र लखापति तो बळवंतहि[2] नित्य सुपथगमनिं सजो
विद्यालंकृत होउन पंचकडी मिळुन ' रामहरिसे[3] ' भजो

देशयशाचे वर्धक सांप्रत अति दीन क्षेत्रकार सदा
होवोत धान्य वृष्ट इंहिं संपन्न असो प्रसन्न त्या रसदा

वाणी सुतार गवळी लिंगाइत भिल्ल आणि येसकर
तव दरबार अभेदचि तार सकल तूं जगांत येश कर

विमले, सदये, आई, नामसुधे, वकिलि शिशुकृता सरली
यश दे सुकल्पना मम, कमलें तव जलिं, तरंगसम विरली

कोठूर, १९००

---

१ अण्णाराव बरव्यांचे चिरंजीव. २. अण्णारावांचे पुतणे. ३ अभिनवभारत या गुप्तसंस्थेचें पहिलें एक टोपणनांव ' रामहरी ' हें असे.

## १५ नाशिक येथील गोदातटाकीं

[ श्लोक

होतों पहात बसलों सुवयस्य-वाट
राजे पुढें युवति-युक्त सुरम्य घाट
तों सूटला सुरभि दक्षिण मंदवात
मद्दृष्टिचेसह घुसे युवतीजनांत

लज्जीत पाहोनि मुखास इंदू
तीं दिव्य मोत्यें मुखघर्म-बिंदू
अशी धुवी वस्त्र सुशोभनास्या
ज्योत्स्नेसमा हांसत मंद हास्या

घर्मांचिया सुंदर बिंदु पंक्ती
भालावरी निश्चल शोभताती
दे चालना वायु जईं तयांसी
बिंदीच वाटे डुलते मनासी

सौंदर्य-खाणीवरली भुजंगी
वेणी, मणी पुष्पचि रक्तरंगी
शंकोनि वायू भिउनी पळाला
निर्जीव मागोनि बघोनि ठेला

ओलें सुटे, फांकत देहकान्ति
कोणी सती नेसत वस्त्र होती
वाहूनि नेण्या वसनासि तीच्या
सदंबराला शिवला सतीच्या

कोपें भरे, धाष्ट्र्य बघोनि साची
ज्वालाचि कीं कोपहुताशनाची
जई तया तीव्र कटाक्ष मारी
जाळील वाटे जगतीच सारी

वायू थरारे, भयभीत तीच्या
लागे पदाब्जासि महासतीच्या
सर्वेचि तो थोर जवें पळाला
"विनायकाचा"हि वयस्य आला

नाशिक, १९०१

## १६ केरळकोकिळकारांचें स्वागत

**परिचय**—नाशिक येथें त्या वेळीं नुकत्याच स्थापन झालेल्या मित्रमेळा संस्थेस भेट देण्यास केरळकोकिळचे संपादक येणार होते. त्यावेळीं विनायकरावांनीं रचलेले श्लोक.

[ शार्दूलविक्रीडित

श्रीमच्छंभुशिरावरी विलसते गोदावरी सर्वदा
पापक्षालनकाम, सन्मुनिवरें जी वेष्टितां सर्वदा
धांवे श्रेष्ठपदस्थिता परि धुवूं नीचांग गंगासती
श्रेष्ठा मूर्ति तुझी अम्हांस्तव इथें येतां तशी भासती

होती नांदत कीर्तिदेवि तुजला सेवूनि अत्यादरें
श्रीगीताजननी तुझी तव गृहा येतां त्वरें त्या दरें
सासूचा छळ आठवोनि निसटे गेली पळोनी दुरी
माझ्या कर्णपथें असें कळविण्या धैर्यासि जिव्हा करी

---

१ केरळकोकिळकारांच्या सर्व कवितांहून त्यांनीं केलेल्या गीतेवरील श्लोकांनीं त्यांची कीर्ति फार वाढली.

श्रीराजा शिव घोर शत्रुदमनीं दादा भरारी भले
स्तोत्रें त्वद्रचितें तयांवरिल, जे दैवें अम्हां लाभले
ही जिव्हा जपते तसे निशिदिनीं हे कर्ण नादावले
दृष्टी ही न चळे हिला उगिच म्यां त्वद्दर्शना दाबलें

बिंदूंचें बनतें तळें हृदयिं या सृष्टिक्रमातें धरा
हिंदू जे असतील सर्व मिळुनी एकी करा रे करा
निंदूनी जनघातकारक सुखा देशाभिमाना वरा
शुक्लेंदूज्ज्वल वर्धमान यश हो विज्ञापना ईश्वरा

या या राष्ट्रहितार्थ नित्य झटुनी कर्तव्यकर्मा स्मरा
द्याया शासन यां परांस बुध हो मानेल विश्वंभरा
वायां सोडुनि वाद, संघ करुनी रे उद्धरूं ही धरा
द्याया सिद्धिस उच्च हेतुस अशा ही[1] जन्मली सुंदरा

आजी येउनियां अमूल्य अपुल्या वेळांत आम्हांवरी
त्वां जी केलिस सत्य ती उपकृती विज्ञापना ही वरीं
पाजीं या तरुणांस बोध सुरसा दोषांसही सांवरीं
गाजी तूं कर गा दया त्यजुनियां रोषास दासांवरीं

नाशिक, १९०१

१ ही मित्रमेळा संस्था. हिचे उद्देश वरील दोन श्लोकांत ग्रथिले आहेत.

## १७ वृषोक्ति

**परिचय**—जव्हारला जातांना लागणाऱ्या घाटांत सुचलेले विचार या कवितेंत मांडले आहेत.

[ शार्दूलविक्रीडित

गाडीला वृष जुंपिला धरित जो जूं थोर मानेवरी
आला उंच चढून घाट दमला गेला अवांका तरी
होता वाहुन नेत वाहन तईं तो मंदचारी तया
कोणी हिंदु वदे सगर्व हृदयें धिक्कारवाणीस या

हा धिक् रे वृष, मान वांकवुनियां तूं दाससा राबसी
मोठें जूं जड हें असह्य भर हा विश्रांतिही ना तसी
तोंडीं ये बहु फेंस त्राण नुरला मारी धनी हा तरी
वाटे पापचि मूर्तिमंत वृष रे त्वज्जन्म हा अंतरीं

ऐके तो वृष शांतिनें सकल हे उद्गार त्याचे असे
दावोनी स्मित मंद ज्यांत बहुधा धिक्कार भारी वसे
बोले हिंदुसि त्या अरे मज बहू निंदावचें ताडिलें
ठावी त्वत्स्थिति अल्पही न तुजला हें म्यां मनीं ताडिलें

निंदाव्यंजक शब्द योजुनि बहू माझ्या धन्या निंदसी
कैसा वागवितो तुला तव धनी हें अल्प ना पाहसी
घेतो काम परंतु देत मजसी खायासि माझा धनी
मूढा वेतन काय दे तव धनी शोधोनि पाहें मनीं

त्यानें राज्य अफाट आर्यवसुधा तैसी जया अर्पिली
दोहायास सुवर्णभू सतत त्वां हस्तें जयाला दिली
लोखंडी असतांहि कांचनमया केलीस यद्भू अरे
तो देई तुज काय वेतन तुझ्या स्वामी कथीं सत्वरें

किंवा तूं म्हणशील कीं तव धनी आभार भारी वदे
राजे रावबहादुरादिक तुला मोठ्या किताबांसि दे
ऐसे शुष्क किताब घेउनि तुवां स्वातंत्र्यसंपत् दिली
हा हा! गर्दभ घेउनी सुरभिला वेड्या कशी अर्पिली

'जे. पी.' बैल तसे महावृषभ 'सी. एस्. आय.' नंदी अशा
देईना पदव्या मला मम धनी नाना जरी शुष्कशा
देतो नित्य तृणास गार हिरव्या खाया, पिण्यातें जला
नाहीं घेत मिठावरी कर, नसे मी धन्य का आजला

भारी दावुनियां दया हिणविसी कीं थोर जूं मी धरीं
अंधा पाहसि ना परंतु अपुल्या जें काय मानेवरी
आहे जें जड फार भूमिवरल्या साऱ्या नगांहूनि तें
गर्वे उद्धतशा तुझ्याहिवर तें रे एक जूं राहतें

नक्षत्रांहुनिही असंख्य वसती अन्याय ज्या अंतरीं
जाळी जें ज्वलनाहुनी यमपुरी ज्याहूनि आहे बरी
नाशाचा जबडाचि कीं अवदशा माहेर ज्या मानितें
देती ज्याप्रति 'पारतंत्र्य' अभिधा जूं वाहसी हाय तें

माता आर्यवसुंधरा पर तुझ्या डोळ्यांपुढें भोगिती
दारिद्र्यासह पारतंत्र्य दुबळ्या मानेवरी लादती
तेव्हां येउनि मानवी जनुस बा तूं साधिलें काय तें
भूभारापरि गर्वभार अजुनी त्वच्चित्त कां वाहतें?

तूं निःशस्त्र परंतु मी न अजुनी निःशृंग झालों तरी
स्वशृंगें तुज फाडितों, बघ गड्या सोडोनि देतों परी
सोडीं गर्व स्वदेशभार हरण्या यत्नांसि आधीं करीं
होई ईशपदीं सुलीन पुरवी सद्धेतुला श्रीहरी

जव्हार, १९००

## १८ श्रीशिवाजीमहाराजांची आरती

**परिचय**—फर्ग्युसन कॉलेजांतील "आर्यन संघ" नांवाच्या चौथ्या भोजनसंघामध्यें दर आठवड्यास म्हणण्यासाठीं ही आरती रचली.

[ चाल : आरतीची

जयदेव जयदेव जय जय शिवराया
या या अनन्यशरणा आर्यां ताराया ॥ ध्रु० ॥

आर्यांच्या देशावरि म्लेंच्छांचा घाला
आला आला सावध हो शिवभूपाला!
सद्गदिता भूमाता दे तुज हांकेला
करुणारव भेदुनि तव हृदय न कां गेला? १

श्रीजगदंबा जीस्तव शुंभादिक भक्षी
दशमुख मर्दुनि जी श्रीरघुवर संरक्षी
ती पूता भूमाता म्लेंच्छांहीं छळतां
तुजविण तिज शिवराया कोण दुजा त्रा २

त्रस्त अम्ही दीन अम्ही शरण तुला आलों
परवशतेच्या पाशीं मरणोन्मुख झालों
साधु परित्राणाया दुष्कृति नाशाया
भगवान् भगवद्गीता सार्थ कराया या ३

ऐकुनियां आर्यांचा धांवा महिवरला
करुणोक्तें स्वर्गी श्रीशिवनृप गहिंवरला
देशास्तव शिवनेरीं घेई देहाला
देशास्तव रायगडीं ठेवी देहाला
देशस्वातंत्र्याचा दाता जो झाला
बोला तच्छ्रीमच्छिवनृप की जय बोला ४

पुणें, १९०२

## १९ विश्वांत आजवरि शाश्वत काय झालें ?

**परिचय**—खालील कविता ‘ आर्यन वीकूली ’ साठीं प्रथम रचली. नंतर ‘ काळ ’ पत्रांतही प्रसिद्ध झाली.

[ वसंततिलका

पौर्वात्य खंड अवघें जित यत्प्रतापें
दारिद्र्य आणि भय कांपति ज्या प्रतापें
नाशासि पारसिक[1] तेहि पलांत गेले
विश्वांत आजवरि शाश्वत काय झालें ?

तें जिंकि पारसिक, दे जगता दरातें,
जें दिग्जयी बल तुझेंहि शिकंदरा, तें
ध्वंसीत रोम[2] तव राजपुरीं रिघालें
विश्वांत आजवरि शाश्वत काय झालें ?

साम्राज्य विस्तृत अनंत असेंचि साचें
त्याही महाप्रथित रोमकपत्तनाचें
हूणें[3] हणोनि घण चूर्णविचूर्ण केलें
विश्वांत आजवरि शाश्वत काय झालें ?

हा उन्नती अवनतीस समुद्र जातो
भास्वान् रवीहि उदयास्त अखंड घेतो
उत्कर्ष आणि अपकर्ष समान ठेले
विश्वांत आजवरि शाश्वत काय झालें ?

---

१ पारसिक — इराणी पारसिकांचें पहिलें प्रबळ साम्राज्य. तें शिकंदरानें जिंकिलें. २ त्या शिकंदराचें साम्राज्यकेंद्र जो ग्रीस देश तोही कालेंकरून रोमन लोकांनीं पादाक्रांत केला. ३ त्या रोमन साम्राज्यानेंही शेंकडों वर्षे अजिक्य राजवट केल्यानंतर अगदीं रानवट वाटणाऱ्या “ हूण ” लोकांनीं त्याचेहि तुकडे तुकडे करून टाकले.

जे मत्त फारचि बलान्वित गर्ववाही
उद्विग्न-मानस उदासहि जे तयांहीं
हें पाहिजे स्वमनिं संतत चिंतियेलें
विश्वांत आजवरि शाश्वत काय झालें ?

पुणें, १९०२

## २० बालविधवा-दुःस्थितिकथन

**परिचय**—मुंबईच्या हिंदु युनिअन क्लबाच्या हेमंत व्याख्यान-माला कमिटीनें खालीं दिलेल्या विषयावरच्या उत्तम कवितेस २० रुपयांचें बक्षीस देऊं केलें होतें. त्याबरहुकूम ज्या अनेक कविता कमिटीकडे आल्या त्यांपैकीं रा. श्रीपाद नारायण मुजुमदार, बी. ए. आणि रा. विनायक दामोदर सावरकर यांच्या कविता कमिटीस बहुतेक समान योग्यतेच्या वाटल्यावरून, मूळ रकमेंत आणखी १० रुपयांची भर घालून त्यांस प्रत्येकीं पंधरा पंधरा रुपयांचें बक्षीस देण्यांत आलें.

विषय—"प्रस्तुत सुरू असलेल्या ग्रांथिक सन्निपातानें ज्या हिंदु स्त्रियांवर अल्प वयांत वैधव्याचा घाला पडला आहे, त्यांच्या स्थितीचें वर्णन करून, त्यांचें दुःख कमी करावयासाठीं उपाय योजण्यास झटावें, अशी नव्या व जुन्या मतांच्या लोकांस कवीनें प्रोत्साहनपर विनंति करणें."

[ आर्या

पाया परवशता ज्या, दुष्काळाच्या शिलांहिं जो रचिला,
अवनति-कृतांत-केलि-प्रासादा प्लेग कळस त्या खचिला

नंदनवनसम मोहक सृष्टीचा सारभूत हा देश
हो दृष्टि धन्य पाहुनि, धरुनि असा प्लेग हृदयिं उद्देश

आर्यावर्ती आला, मुंबइला ठेविलें मग पदाला;
झाला अंत सुखाचा, ये ऊत अनंतवक्त्र-विपदांला

जी ऐकिली तयाहुनि शतपट अधिकाचि सुरुचिता धन्या
पाहुनि भुलला खुलला; वदला : मोहक न भू अशी अन्या

नाना-स्थल-स्थिता श्री अवलोकुनि नित्य मी नवीनवि ते
येथ बसेन प्रत्यहिं सृष्टि रुचीला जिथें नवीन विते १०

केला निश्चय ऐसा, कुरवाळुनि मुंबई भयाण करीं
हो धिग् न निज जिणें तें, यास्तव बघण्या पुणें प्रयाण करी

गोदास्नानास्तव करि श्रीमत्त्र्यंबकपुरीस गमनाला;
आला पंचवटीला तेथुनियां रामराय-नमनाला

बहु काय वदों? केलें एक्या अब्दांत देशपर्यटना
पवनाहुनि जवन, नची दमला हा कीं विचित्र विधिघटना

प्लेग कशाचा आला? कृतकर्माचाचि भोग अवतरला
कर्मायत्त फळाच्या उपभोगावीण कोण भव तरला?

केलीं भयाण नगरें, नगरासम दाट सर्व वन वसतें
दमले नमले गमले हतसत्त्वचि मंत्र तंत्र सुनवस ते २०

लाल गुलालें आणिक ओतियलेल्या समग्र कावडिनें
आरक्त नगरमार्गी रक्तप्रिय नाचताति आवडिनें

" बोलो भाई राम " ध्वनि हाचि दिगंत सर्व नभभर तो
वातावरणस्थांहीं प्लेगजनक काय तापभर भरतो?

गृहनिर्गत हा येथें लोटचि अपशकुनसूचक धुराचा
येतो, तत्सह दु:सह हा स्वर कीं विरहतप्त विधुराचा

" हे कान्ते! हे कान्ते! दे ओ! तव कान्त मारि हांकेला
कैसा संसाराचा जड गाडा लंगडा अहा केला

मी शून्यहृदय, माझी हृदयस्था देवि ती वरा गेली;
क्षण थांब सखे, येतों हां होउं नको अतीव रागेली " ३०

तैसा ये कोमलसा कोणाचा येथ रोदनस्वर हा ?
हां कळलें; मंद रवें रडतो कुणि एक बाल भास्वर हा
" बाबा, आई गेली टाकुनियां काल, तों तुम्ही मजला
आजचि या बालाला त्यजुनीयां जावयासि कां सजलां ?
किंवा गेलास तिला परलोकीं सोबतीस ? सांग मला
परि बाबा, संसाराक्रमणा शिशु हा समर्थ कां गमला ? "
परि हाय ! हृदयदाही मंजुळरवसंघ थोर हंबरडे
येताति कुठोनी हे ? कीं हा पुरदेवताकदंब रडे ?
" मत्सौभाग्यश्री-पति, मत्प्रिय, मज्जीव, मीनकासारा !
आटविला एकाकीं प्रीतीचा धवल ओघ कां सारा ? ४०
कां द्या ना प्रत्युत्तर ? कां केला आज हा असा रुसवा ?
भ्यालें मी; द्या रमणा धीर मना अंकिं एकदां बसवा
उपभोग भोगिला नच संवत्सरही अहो नितांत पुरा
सजणा ! सजलासि कसा जायाला एकला कृतांतपुरा ?
जे आपण घालविले प्रेमाच्या चंद्रिका-करें भरले
आठवती का ते दिन जे निमिषार्धांत वाटती सरले ?
मी एकटीच असतां आपण भिवबावया मला आलां
पाउल चुकुनी वाजुनि म्यां बहु उपहास आपुला केला.
तो डाव धरोनी का मौन वरा घाबरी करायाला ?
भ्यालें मी, हांसेन न माझ्या आतां बरीक रायाला ५०
पोटीं राग नसोनिहि उगिच अबोले कितीकदां व्हावें;
उभयांसही न कळतां कैसें तत्काल बोलुं लागावें
क्षुल्लकशा मानास्तव कोपें क्षणिकें रुसोनियां बसलों,
दृष्टीस दृष्टि मिळतां हेतुव्यतिरिक्त उभयही हंसलों

हें सर्व आठवे का? देतें तत्स्मरण काय मोद मना ?
कां प्रत्युत्तर द्या ना प्रिय अबलाहृदयभीतिचे दमना ?
तरि काय कान्त गेले ? मणिमंगळसूत्र काय मम तुटलें ?
नष्टा दैवा, तडकुनि केंवि तथापी न हृदय हें फुटलें ?
जो मम संकट वारिल ऐशाला शरण मीं कुणा जाऊं ?
जाउनियां या फुटक्या नष्ट कपाळासि केंवि मम दावूं ? ६०
जातां नाथ स्त्रीचा ती गाईहूनि गाय मानावें,
सुटका अबलांची त्या करण्या घेसी न कां यमा नांवें ?
बंधू ना, बांधव ना, ना मातापितर ज्या अभागीतें
त्या माझीं दुःखाचीं प्रभुजी ! पोंचति न का नभा गीतें ?
मी अल्पवयी बाला, माझा सौभाग्यनिधि अहा जळला
वैधव्याचा दुर्धर भयकर गिरि हा प्रचंड कोसळला
काय करूं ? जाउं कुठे ? हो माझे आप्तसोयरे सारे
तारा अनाथ बाला, छळ बघतां स्वस्थ बैसुनि कसा रे ?
देतें का कोणी ओ अबलेच्या या मदीय हांकेला ?
बोला हो, बोला हो, धीराचा शब्द एक तरि बोला ७०
छे ! कोण देत बसतो अबलेच्या कर्मकाहणिस मान
स्वसुखांत मग्न जन हे लेखिति परदुःख कस्पटसमान
बांधव हो ! परिसतसां का हे दुःखार्त बालिकाबोल ?
गमताति सत्य किंवा भासति तुम्हांसि सर्व ते फोल ?
क्षणभर तरि सदय मनें शांतीनें सर्वही विचार करा
अंधत्व हट्टहि पुरे, न्यायाचा हो इतःपर न विकरा
आला प्लेग तयाचें ठरवायासी निदान धडपडलों
कांहीं नचि ये हातां, केवल अतट प्रपात न धड पडलों

‘ इन्स्पेक्शन् ’ ‘ डिसूइन्फेक्शन ’ ऐशीं शेंकडों शनें उठलीं
हटवायातें याला परि बापुडिं सर्व आपणचि हटलीं ८०

परि या पराजयाचा दोष नसे तिळहि आपुल्यावरतीं
“ यत्ने कृते न सिद्ध्यति को दोषो ” तत्त्व संत हें वदती

परि ज्या कोमल बालांवरती वैधव्य-दु:ख कोसळलें
विरहाग्नीनें प्रखरें आमस्तकपाद देहही जळले

वैधव्य-जनक त्यांच्या दु:सह दु:खासि शमन करवाया
खर्चियलें का अल्पहि सत्कर्मीं सदय सुमन कर वा या ?

तद्दु:स्थिति अडवाया “ इन्स्पेक्शन ” कोणचें उभारितसां ?
त्यांच्या दुर्दैवाला कवण्या मंत्रेंकरूनि भारितसां ?

गरिब बिचाऱ्या बाला आधीं अबला, अनाथ त्यावरती
हाय ! तिरस्कृत होती निष्कारण लौकिकांत बावरती ९०

जातां पती अकालीं बालेला शून्य दशदिशा होती
माहेरीं श्री नसली, पुसतां मग काय ते दशा हो ती

पायगुणाची आली भक्षायालाचि एकदां पतितें
खरतर शब्दशरानें दीर नणंदा अनेक दापति ते

प्रेमानें बोलविण्या ‘ क्षण माझ्या आज बाइ ओका या ’
नाहीं कोणी उरलें मायेचें दु:ख कांहिं ओकाया

युवती बरोबरीच्या पतिसह करिती विलास हांसति तें
पाहुनि, विहरज्वाला जाळी अधिकाचि दु:सहा सतितें

चुकवी संतत वदना लज्जायोगें जनांसि दावाया
कंठी आयुष्यातें धरुनी जीवा मनासि दावाया १००

नेत्र जलें डबडबले, कोमल मृदु गाल जाहले ओले
गेले खोल कपोलहि, क्षयसूचक पांडुरत्व बहु आलें

स्वपतिविना स्वप्नींही परपुरुषीं नाहिं नेत्र जोडियले
जीनें पतिनिधनास्तव सोडियले भोग हार तोडियले

शय्या भूमि निजाया, अशन अहोरात्रि एक लागावें
जित काममोह असती, सतिमालाकीर्तनीं जिला गावें

तन्मुख अपशकुनास्पद, शुभवदना विश्वयोषिता गणती
सुरभीला मेखुर ते, सौंदर्यागार गर्दभी म्हणती !

स्वस्त्रीच्या निधनोत्तर जरि होति न विधुर अशुभदर्शन ते
तरि विधवांवरि दुश्चिन्हांचें कां व्यर्थ ये सुदर्शन तें ? १९०

व्यर्थचि दुरुक्तवचनें द्याया विधवांचिया मना चटका
सजते ती न झडावी खलजिव्हा दुष्टकामना चट कां ?

इच्छिति तितुके वेळां विधुरांनीं षड्रसांसि भक्षावें ;
नित्यैकभुक्त राहुनि विधवांनीं परि कदन्न लक्षावें

दुकुलालंकारानें विधुरजनांचें शरीर वांकावें
हलक्या वस्त्रें संतत विधवांनीं वपु परंतु झांकावें

मांगल्यप्रद व्हावें विधुराचें नीचशाहि वदन खरें
गुरु सांगे शिष्यातें : विधवेचें अशुभसेंचि पद नख रे

साठीच्या जरठांनो, विधुरांनो, नव वधू खुशाल वरा
लग्नाच्या अष्टदिनीं विधवा परि अन्य ना वरो नवरा १२०

हा न्याय कोण ? कां हो विधवा-विधुरांत भेद हा असला ?
कसल्या अपराधाचा अबलांना क्रूर दंड हा बसला ?

श्रुति काय अनुज्ञेतें देते विधवांसि अशुभ लेखाया
सांगाल काय तच्छल हा संमत होय निगमलेखा या ?

किंवा स्मृति हें कथिती ? किंवा दे धर्मशास्त्र संमतिला ?
सदसद्विचारपूर्वक किंवा हें न्याय्य गमतसे मतिला ?

पत्निनिधन विधुराचा सामाजिक हक्क नाश करिना तें
स्त्रीचें समाज-संमत पतिनिधनें नष्ट कां तरी नातें?

अस्मत्समाज वर्ते क्रौर्यें जरि ना तथापि अन्यायें
विधवांशीं इतुक्या कीं कींव तयांची परस्थ अन्यां ये    १३०

लज्जास्पद आम्हां परि सिद्ध गमे, हेंचि अन्य ना कांहीं
धर्मानें न्यायानें तर्कानें सद्विवेकमतिनेंही

आजवरी हें पातक अन्यायाचें यथेच्छ सांचविलें
तत्क्षालनें सुकृत्या अजुनि तरी पाहिजेच वांचविलें

त्यांतहि दुर्दैवानें धाडियलें प्लेगरोगविष जहर
प्रत्यहिं असंख्य बाला विधवा बनती अपूर्व ये कहर

ऋतुशांतीचेचि दिनीं कितिकांचें कान्तनिधन होय, किती
तत्पूर्वींही वैधव्याच्या वार्तेसि हंत आयकिती

त्यांतहि घडतें न असें अपवादास्पद परंतु नित्यहि तें
ह्यासम न अन्य घातक प्लेगोत्पादक अनंत अत्यहितें    १४०

ज्यांच्या गृहिणी जाती, कालानें ते गृहस्थ होतात;
कन्यापुत्रहि लाभति द्यायाला धीर स्वस्थ हो तात

वृद्धाचा सुत गेला, स्वांकीं तो दत्तकासि घेईल
स्वपिता मरतां तद्विण सुत संसारीं समर्थ होईल

सर्वांसि उपाय असे शास्त्रानें वा सुरूढिनें विहित;
परि न दया ये उभयां विधवांचें साधण्यास तें विहित

शास्त्रें उपेक्षिल्या त्या, छळिल्या रुढिनें तयांत शतपट हो
अबलांना विधवांना अजुनि तरी तारण्यास खटपट हो

आतांहि जरि उपेक्षा दुःस्थितितुनि त्यांसि उद्धरायातें
तरि हा पातकपर्वत शक्त न होइल धरू धरा यातें    १५०

वैदिक हो भिक्षुक हो उद्धारक हो अहो सुधारक हो
सदय मनानें कोणी अबलांना संकटांत तारक हो

अवलोकितां न पतिचें वदनहि, वैधव्य मात्र अवलोकी
कां तत्पुनर्विवाहा प्राप्त असो संमती न नव लोकीं?

धर्माभिमान म्हणजे कांहीं सुविवेकशून्यता नाहीं
कालस्थितिवश धर्महि आहे हें तत्त्व मान्य मान्यांही

सुज्ञानें सुविचारें स्थित्यनुसारें स्वधर्म सुधरावा;
आपद्गतिचा धोपट मार्गचि हा हट्ट व्यर्थ न धरावा

संस्थापक धर्मांचे, ज्ञाते श्रुतिशास्त्रतत्त्वकर्मांचे
आचार्यहि स्वकर्में स्थापिति औचित्य ह्याचि मर्माचें १६०

त्या गादीचे स्वामी आम्हां तत्समचि पूज्य होतात;
त्यांसचि विनवूं: वारा अबलांचें दु:ख पूज्य हो तात!

साठीचा वृद्ध कपी नववधु तारुण्यरूपभवन वरी,
तेंवि न मागों आम्ही जरठा विधवाहि होउ नव नवरी

परि ज्यांसि पतिसुखाची आली कांहींच कल्पनाही ना
त्यांच्या पुनर्विवाहा म्हणणें घेउनि विकल्प नाहीं, ना?

आतांहि जरी द्याना अपुला ह्या मागणीस परवाना
हा प्लेग स्त्रीजाती नष्ट कराया धरील परवा ना

ऐसें पुसाल हांसुनि कीं स्त्रीपुरुषांसि हा समान वधी
स्त्रीचाचि द्रव कां हो? जाणुं न शकणार खास मानव-धी १७०

तरि परिसा आधिं वधी पुरुषांइतुक्या स्त्रिया, परी वरि तो
पुरुषां मारोनि वधू त्यांच्या मेल्यासमानची करितो

ऐसा कहर दुहेरी प्लेग करी स्त्रीजनांवरी भारी
तारा त्यांसी भगवन् अबला होतील फार आभारी

आपण अस्मद्धर्माचार्य असां आपुल्याविणें कांहीं
होणार सर्वसंमत ऐशी सद्योजना न लोकांही
ज्या दीन बालविधवा, द्या त्यांसि पुनर्विवाह-संमतिला
व्हा सदयहृदय सकृप जें होइल मान्य सत्य सत्तिला
अपमानास्पद वर्तन विधवांप्रति नित्य जें समाज करी
आज्ञादंड धरोनी तत्प्रतिषेधा कराचि आज करीं १८०
विद्यादाना द्यावें शाला स्थापोनि प्रौढ विधवांतें
अज्ञान सुविद्येनें नष्टचि अभ्रें अनेकविध वातें
विद्यादान स्त्रीप्रति अर्थ न पारि तें अनर्थ करणार
वदति, सुधाप्राशक तो अमरत्व न मृत्युलाच वरणार
म्हणतील सुधा-पेया, परि दैत्यां देउं देव ना सजती
तरि काय मयाभगिनीवर्गा ते दैत्य लेखण्या धजती ?
विधवा विदुषी व्हाया स्थापूनि अनाथबालिकाश्रम ते
जोडा पुण्य न होइल तुष्ट बघुनि दीनवालि का श्रम ते ?
नीतिव्यवहारादिक थोरांच्या रम्य सत्कथा शिकवा
हंगाम ज्ञानाचा सच्छिक्षावृष्टिनें सदा पिकवा १९०
होईल सुशिक्षितसा विदुषींचा वर्ग येथ नव लोका
गृहशिक्षण देउनि जो तारिल भावि प्रजेसि अवलोका
तारायाला माता भगिनी लेकी स्नुषा स्वभावजया
होईल कोण सिद्ध न, अहा! असे मानवी स्वभाव जया ?
कुंकुमविरहित भालें युवतिजनांचीं असंख्य संतत तीं
पाहुनि लज्जायोगें खेदें झांकोत नयन संत-तती
वृद्ध तरुण नविन जुने नेमस्त जहाल लोक तरि सारे
व्हारे सुसज्ज विधवा-दु:स्थितिहरणासि आजि परिसा रे

सत्वर कडाड मोडा हानिद ह्या रूढिचा महा खोडा
तोडा दु:स्थिति-बेडी अबला तारोनि धवलयश जोडा २००
धर्मा तारायाला, अज्ञाना रूढिच्या हरायाला,
कालीं कालीं येवो भक्तावन ईश तो करायाला,
ठेवी लेखनिला हें विश्वेशा विनवुनी विनायक तो
नायक तो जगताचा भक्तस्तवनासि मुदित आयकतो

पुणें, १९०२

## २१ हे सदया गणया तार

[ चाल : तूं टाक चिरुनि

हे सदया गणया तार । तुझ्यावरि भार
तूं मायबाप आधार । तुझ्यावरि भार
किति देश-शत्रु भूतलीं
हच्छत्रु सहाही परी
शापें वा सुशरें जाळी
तो ब्राह्मण आतां खाई परक्या लाथांचा बा मार १
देशावरि हल्ला आला
पुरुष तो लढोनी मेला
स्त्री गिळी अग्निकाष्ठाला
रजपूत परी त्या परवशतेचें भूत पछाडी, तार २
अटकेला झेंडा नेला
रिपु-कटका फटका दिधला
दिल्लीचा स्वामी झाला
तो शूर मराठा पाहिं तयाचे खाइ न कुतरें हाल ३

नाशिक, १९०२

## २२ शिववीर

[ चाल : श्रीगीताच्या चालीवर

यवनांचा झाला, अवनीला भार
सुंदर मंदीरें भंगीलीं पार
वेद-शास्त्रें नष्टांनीं भ्रष्टविलीं सारीं
गोमाता देखतां हरहर मारी
ब्राह्मण मत्तांनीं लत्तांनीं हणिला
प्रभुवर भूवर शिववीर आला
अधमांसी नाशोनी देशोद्धाराला
प्रभुवर भूवर शिववीर झाला १

हिंदूंच्या देशाचे बघुनीयां हाल
जगताची जननी ती जाहली लाल
यवनांना क्रोधानें वधण्यासी आई
शिवनेरीं शिवबासी जननासी देई
सुस्वरां किन्नरां आनंद झाला
प्रभुवर भूवर शिववीर आला २

रामा कौसल्या कीं कृष्णा यशोदा
शिवराजा जिजाई साजे जन्मदा
श्रीरामें राक्षस-हननासी केलें
यवनांना नाशीन तैसें मी बोले
सुकलांनीं शशिसम तो वृद्धिंगत झाला
प्रभुवर भूवर शिववीर आला ३

जयजयजी रघुवीरा, गर्जना झाली
श्रीरामदासांची मूर्ती उदेली

शिवभूपें पायीं दृढ भालाला केलें
स्वामींनीं मस्तकीं हस्ता ठेवियलें
देशा धर्मा तारीं, उपदेश दीला
प्रभुवर भूवर शिववीर आला ४

मातला अफजुला यवनांत भारी
तुळजापुरीं भंगी भवानी सारी
करकर चावोनी अधरांला धावे
शिवरायाचेवरि, परि दुःखाला पावे
उदरा वीदारोनी नीचाला वधिला
प्रभुवर भूवर शिववीर आला ५

स्वातंत्र्यदेवीचा गोंधळ केला
यजमानस्वामी श्रीशिवराय आला
सांवळ्या रंगाचे शूर मावळे
प्रेमानें अभिमानें गोंधळी झाले
पारतंत्र्याचा मग बोकड चिरिला
प्रभुवर भूवर शिववीर आला ६

धर्माला तारियलें अरिवर मारियले
स्वातंत्र्या संपादुनि देशा शोभविलें
अवतार-कृत्याला पूर्णत्वा नेलें
छत्रपती शिव नृप मग निजधामीं गेले
सविनायक कविनायक गाती कवनाला
प्रभुवर भूवर शिववीर आला ७

त्र्यंबकेश्वर, १९०३

## २३ श्रीबाजी देशपांडे यांचा पोवाडा

[ चाल : चंद्रकांत राजाची.

जयोस्तु ते श्रीमहन्मंगले शिवास्पदे शुभदे
स्वतंत्रते भगवति ! त्वामहं यशो-युतां वन्दे

स्वतंत्रते भगवती ! या तुम्ही प्रथम सभेमाजी
अम्ही गातसों श्रीबाजीचा पोवाडा आजी

चितोडगडिंच्या बुरुजांनो त्या जोहारासह या
प्रतापसिंहा प्रथित-विक्रमा, या हो, या समया

तानाजीच्या पराक्रमासह सिंहगडा येई
निगा रखो महाराज रायगड की दौलत आई

जरिपटका तोलीत धनाजी संताजी या या
दिल्लीच्या तक्ताचीं छकलें उधळित भाऊ या

स्वतंत्रतेच्या रणांत मरुनी चिरंजीव झाले
या ते तुम्ही राष्ट्रवीरवर, या हो या सारे

घनदाट सभा थाटली । गर्जना उठली । घोर त्या कालीं

जय स्वतंत्रतेचा बोला
जय राष्ट्रदेविचा बोला
जय भवानि की जय बोला

तुम्ही मावळे बोला हरहर महादेव बोला
चला घालुं स्वातंत्र्य-संगरीं रिपूवरी घाला १

हरहर गर्जुनि सर्व मावळे वीर सज्ज असती
परंतु कोठें चुकले बाजी यांत न कां दिसती ?

हाय हाय तो म्लेंच्छांसंगें घडित बैसलाची
स्वदेश-भूच्या पायासाठीं बेडी दास्याची

ऐकुनियां शिवहृदय तळमळे म्हणे ‘ दूत हो जा
बोधुनि वळवा वीर बाजि तो तुम्ही राष्ट्रकाजा ’

शिवदूत तेधवां जाती । बाजिला वदती । सोड रे कुमती

कां जिणें तुच्छ हें नेशी ?
कां म्लेंच्छ कसाई भजसी ?
कां दास्य-नरकिं तूं पचसी ?

स्वराज्य नाहीं स्वदेश नाहीं धिक् त्या देहाला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला २

बाजीराया, म्लेंच्छ सबळ हा दोष न काळाचा
ना देवाचा, ना धर्माचा, किंवा नशिबाचा

देशद्रोही चांडाळांचा भरला बाजार
गुलामगिरि जे देती त्यांना निष्ठा विकणार

तुम्हींच ना स्वातंत्र्य चिरियलें या पोटासाठीं
तुम्हींच ना रे भूमातेच्या नख दिधलें कंठीं

हो सावध बाजीराया । दास्यिं कां काया । झिजविसी वांया ?

तुज भगवान् श्रीशिवराजा
स्वातंत्र्यप्राप्तिच्या काजा
बोलावी तिकडे जा जा

देशभक्तिची सुधा पिउनि घे प्रायश्चित्ताला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला ३

शिवदूताचे बोल ऐकुनी बाजी मनिं वदला
काळसर्प मीं कसा उराशीं मित्र म्हणुनि धरिला

घरांत शिरला चोर तया मीं मानियला राजा
बंड बोललों शिवरायाच्या परमपूज्य काजा

माता माझी भ्रष्टविली मी राजनिष्ठ त्यांशीं
या पाप्यानें युद्ध मांडिलें देश-रक्षकाशीं

जा सांगा शिवभूपाला । अशा अधमाला । राजनिष्ठाला

त्वां आधीं शतदां चिरणें
तुजकरवीं घडतां मरणें
पावेन शुद्धि मग मानें

तुझ्या करींच्या तरवारीच्या घेइन जन्माला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला ४

देशभूमिच्या कसायास कां इमान मी दावूं
भाकरि देतो म्हणुनि तयाच्या चाकरीस राहूं

कवणाची भाकरी बंधु हो ! चाकरि कवणाची
भाकरि दे भूमाता, चाकरि तिच्या घातकांची

राज्य हिसकिलें, देश जिंकिला त्या पर अधमासी
राजनिष्ठ तूं राहुनि कवण्या साधिसि नरकासी

ही गुलामगिरीची गीता । राजनिष्ठता । यापुढें आतां

मद्देशचि माझा राजा
तो प्राण देव तो माझा
मी शरण शिवा सांगा जा

राख उडाली प्रदीप बाजी वैश्वानर ठेला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला ५

लोट धुळीचा सुटला अवचित दीन शब्द उठला
लगट करुनि सिद्दिनें पन्हाळागड वेढुनि धरिला

लक्ष्मीचें मृदु कमल, शारदासुंदरिचा वीणा
स्वतंत्रतेचा कलिजा अडके गडांत शिवराणा

अफझुल्ल्याच्या वधा स्मरोनी फाजल सुत त्याचा
करितो पण तो शिवभूपाला जिवंत धरण्याचा

बापासि तुझ्या जो खडे । चारि रोकडे । जाशि त्याकडे

जीवंत धरूं तरि साचा
जीवंत पवन धरण्याचा
अभ्यास अधीं कर याचा

खुशाल हरणा मग तूं धावें धरण्या वणव्याला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला ६

बाजि लागला शिवभूपाच्या थोडा कानाला
हातीं भाला एक मावळा गडाखालिं आला

सिद्दि पहातां चुकुनि हात समशेरीला गेला
दावुनि त्याला मुजरा केला धीट नीट वदला

शिवाजि राजा जिवंत येतो तुमच्या गोटाला
उद्यां सकाळीं करुं गड खालीं कळवी तुम्हांला

ऐकुनी सिद्दि बहु फुगला । रिपूजन भुलला । परस्पर वदला
अजि खान खान खानाजी

हुअे शिकस्त मराठे आजी
फिर लढते क्यौंकर आजी
चलो शराब उडाये ताजी
आप लेओ आप लेओ जी
आप गाजि। आप तो रणगाजी

झिंगविला अरि-सर्प फुंकुनी पुंगी गुंगविला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला ७

गुंगविला अरि-सर्प! शिवा गारोडि गडावरि तो
प्रहर रात्र उलटतां मराठी जादू मग करितो

कृष्णपक्षिच्या काळ्या काळ्या त्या रात्रीं दडल्या
गर्द झाडिला भिउनि चांदण्या बाहेर न पडल्या

अशा तमीं किलकिलें दार कां तटावरी झालें?
बाजि निघाले श्रीशिव आले आले शत भाले

भाला खांद्यावरी मराठा घोड्यावरि स्वारी
भरितां, घोडा थै थै नाचे—तोंच शीळ आली

वीर हो टांच घोड्याला। बाण हा सुटला। अडविणें त्याला

रिपु तुडवित व्हा व्हा पार
चौक्यांसि तुम्हां दावील
काजवा चोर-कंदील

गेला गडतळ गेला सत्तर मैल भूप आला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला ८

तुरी सिद्दिच्या हातीं देउनि सुटतां शिव नृपती
'अब्रह्मण्यम्' कितिक भाबडीं भोळिं भटें वदती

'अब्रह्मण्यम्' यांत काय रे दोष कोणता तो
आला ठक ठकवाया उलटा भला ठकविता तो

साप विखारी देशजननिचा ये घ्याया चावा
अवचित गांठुनि ठकवुनि भुलवुनि कसाहि ठेचावा

ये यथा प्रपद्यन्ते माम् । भजाम्यहं तान् । तथैव धीमान्

भारतीं कृष्ण वदला हें
अधमासि अधम या न्यायें
रक्षिलें राष्ट्र शिवरायें

राष्ट्ररक्षका सावध रे रिपु हुडकित तुज आला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला ९

'पायां पडतों हात जोडतों बाजि तुला राया
गड अवघड रांगणा तिथें तुम्हि जाणें या समया

राष्ट्र-देविचा हस्त कुशल तूं तरि लाखों भाले
अम्हांसारिखे मिळतिल चिरतिल चरचर रिपु सारे'

"जाउं काय मी बाजि, मृत्युमुखिं ढकलुनि तुम्हांला
कधीं शिवा जातिचा मराठा मृत्यूला भ्याला?"

'चढा गड तुम्ही यशोदायिनी तोफा पांच करा
तोंवरि लढवूं, गनीम अडवूं खिंड करूं निकरा

वसुदेव तूंच शिवराया । कंसकपटा या । करुनिया वांया

स्वातंत्र्य-कृष्ण-चिन्मूर्ती
जा घेउनि अपुल्या हातीं
गडगोकुळांत नांदो ती,

गडीं चालला शिव तों खिंडिंत 'दीन' शब्द उठला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला १०

आले आले गनीम खिंडिंत चवताळुनि आले
झाले झाले सज्ज मराठे सरसावुनि भाले

संख्या दुप्पट रिपुची परि ते निकरानें भिडती
हरहर गर्जुनि समररंगणीं तुटोनियां पडती

खड्गांचे खणखणाट त्यांमधिं शर सणसण येती
मारण-मरणावीण नेणती रणीं वीर रंगती

तों हरहर एकचि झाला । वदति जय झाला । म्लेंच्छ हो हटला
चला चढवा नेटाचा हल्ला
वीरश्रीचा करा रे हल्ला
निकराचा चालुं द्या हल्ला

मारित हाणित हटवित म्लेंच्छा खिंडपार केला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला ११

म्लेंच्छ हटवितां बाजी वळुनी गडाकडे पाहे
श्रीशिव चाले मार्ग बघुनियां वीर गर्जताहे

गडांत जाइल राष्ट्रदेविचा जिवलग शिवराणा
तोंवरि लढवूं खिंड शूर हो हा अपुला बाणा

ह्या बाण्याच्या आधिं संगरीं जरि घडतां मरणें
पुनर्जन्म तत्क्षणीं घेउनी पुनः पुन्हा लढणें

रघुराया रावणहरणा। कंस-मर्दना। भो जनार्दना!

लाडक्या देशजननीचे
स्वातंत्र्यरक्षणीं साचें
हें प्राणदान जरि अमुचें

पवित्र हें जरि व्यर्थ हें जरी दे तरि सुयशाला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला १२

आले आले गनीम चालुनि पुनरुपि तों आले
झाले झाले सज्ज पुनरपी उठावले भाले

'दीन दीन' रणशब्दा 'हरहर महादेव' भिडला
भिडला ओष्ठीं दंत मस्तकीं रक्त वक्षि भाला

हल्ला चढवित परस्परांवरि पुनः पुन्हा तुटती
नटुनी योद्धे समरभोजनीं वीररसा लुटती

कचरला मराठी भाला। बाजि तो आला। तोलुनी धरिला

रणिं रंग पुन्हां ये साचा
गर्जती मराठे रिपुचा
घ्या सूड म्लेंच्छरक्ताचा
त्याचा मस्तक चेंडू साचा

समररंगणीं चेंडुफळीचा डाव भरा आला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला १३

डाव उलटला म्लेंच्छांवरि तो पुन्हा परत हटला
जय झाला परि वीर मराठा बहुतांशीं पडला

तिकडे गडिंच्या तोफा अजुनी पांच कां न सुटती
वीर मराठे सचिंत आशाबंध सर्व तुटती

तशांत घेउनि ताजी टोळी फाजलखां येतो
धन्य बाजिची ! पुन्हा उसळुनी रिपूवरी पडतो

खिंड-तोफ तिजमधुनी गोळा सुटला श्रीबाजी
रणीं तळपतो वीरश्रीचा रणनवरा आजी

तों गोळी सूंसूं आली । अहा त्या कालीं । मर्मि ती शिरली

श्रीबाजी विव्हळ पडला
मागुतीं तत्क्षणीं उठला
बेहोष वीरवर वदला

तोफेआधीं मरे न बाजी सांगा मृत्यूला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला १४

थांबा बाजी जखम तरि पुरी बांधूं द्या थांबा
हरहर रणिंचा ऐकुनि वीरा उसळुं नका थांबा

जखम कुठें रे फक्त असें मी तृषाक्रांत थोडा
रिपुरक्ताला पितों घटघटा सोडा मज सोडा

खरी जखम भू-आइस माझ्या फोडी हंबरडा
ओढुनि अरिचीं अतडिं बांधुं द्या पट्टि तिला सोडा

भले मराठे लढा तसेची आलों मी सोडा
लढा लढा सोडा हो मजला म्लेंच्छ पुरा झोडा

होईल तोफ शिवबाची । क्षणीं दो क्षणिंची । खिंड लढवाची

फेडाया ऋण या भूचें
अजि उष्ण बिंदु रक्ताचे
द्या मोजुनि मुद्दल साचें

तिला व्याज स्वातंत्र्य देउनी फेडा कर्जाला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला १५

काय वाजलें बाजीराया बार न गडिं झाला
शिळा कोसळे पान सळसळे पक्षी ओरडला
लढा तरीं मग चला वीर हो रणांत घुसलों मी
रक्तें मढवूं लढवुं खिंडिची तसू तसू भूमी
शपथ तुम्हांला वृक्ष-पक्षि-जल-शिला-तेज-वारे !
आम्ही पडतां तोफेपूर्वी लढा तुम्ही सारे
तों बार धडाधड झाले । प्राण परतले । हास्यमुख केलें
हा पहिला बार शिवाचा
हा दुसरा निजधर्माचा
हा तिसरा निजदेशाचा
हा चवथा कर्तव्याचा
बार पांचवा धडाडला हर बोला जय झाला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला १६

खबरदार यमदूता ! पहुडे श्रीबाजी प्रभु हा
स्पर्शुं नको तद्विद्युत्तेजःपुंज दिव्य देहा
स्वतंत्रतेच्या पूर्वी हा रणतीर्थाला गेला
दशशत्रुरक्तांत न्हाउनी लालभडक झाला
त्याच्या वक्षःस्थळीं रुळे रिपु-रुंडांची माला
तीवर हरहर महादेव हा घोर मंत्र जपला
बघ देवदूतही आले । सूर्य हे आले । इंद्र हे आले
सुरगुरू सुरतरू सारे
अणि देव वर्षती तारे
मधु मृदुल वाहती वारे
ओवाळी सत्कीर्तिसुंदरी श्रीमत् बाजीला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला १७

दिव्य धुनीचा चकचकाट कां विश्वोदरिं भरला
रथ श्रीमती स्वतंत्रताभगवतिचा अवतरला
ऊठ चितोरा ऊठ देविला उत्थापन द्याया
प्रतापसिंहा प्रथितविक्रमा उठिं मंगल समया
भूमातेच्या तान्ह्या उठिं कां वीत-चिंत व्हा ना
असे कुशल रांगण्यांत तुमचा जिवलग शिवराणा
स्वतंत्रतेचा हा पोवाडा ऐकाया आला
उठा सर्व स्वातंत्र्यवीरवर जयमंगल बोला
श्रीस्वतंत्रता भगवती। आपुल्या रथीं। बाजिला घेती
गंधर्व तनन तों करिती
दुंदुभी नभीं दुमदुमती
श्रीबाजी स्वर्गा जाती
करी चराचर विश्व बाजिच्या जयजयकाराला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला १८
तदा मराठे रणीं पहुडले जे आणिक सुर ते
पावनखिंडित बसुनी तिजसह जाति नभःपंथें
श्रीबाजीचें रक्त पेरिलें खिंडित त्या काला
म्हणुनि रायगडिं स्वातंत्र्याचा थोर वृक्ष झाला
अहो बंधुंनो! पूर्वज ऐसे स्वतंत्र रणगाजी
स्वतंत्र त्या पूर्वजां शोभतां वंशज का आजी?
विनवि विनायक यांतिल घ्यावें समजुनि अर्थाला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला
स्वराज्य नाहीं स्वदेश नाहीं धिक् या देहाला
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला १९

नाशिक, १९०६

## २४ तारकांस पाहून

**परिचय**—मुंबई सोडून बॅरिस्टर होण्यासाठीं १९०६ सालीं विनायकराव विलायतेस निघाले. लांबच्या समुद्रप्रवासांत कित्येक दिवस खालीं समुद्र नि वरतीं आकाश यांवांचून कांहींच दिसत नाहीं; वादळेंही सुटतात, समुद्र लागतो. घरचीं प्रियकर माणसें दुरावल्या-मुळें मनास उदास वाटतें. बहुतेक समुद्रप्रवाशांप्रमाणें पहिल्यानेंच घर सोडलेल्या तरुण विनायकरावांचेंही मन प्रियजनांच्या आठवणी येऊन कासावीस होई. तेव्हां केवळ करमणूक म्हणून वादळी व निरभ्र रात्रीं ते बोटीच्या डेकवर फिरत. त्या वेळीं त्यांनीं खालील कविता रचली.

[ चाल: चंद्रकांत राजाची०

सुनीळ नभ हें, सुंदर नभ हें, नभ हें अतल अहा
सुनील सागर, सुंदर सागर, सागर अतलचि हा

नक्षत्रांहीं तारांकित हें नभ चमचम हांसे
प्रतिबिंबांहीं तसा सागरहि तारांकित भासे

नुमजे लागे कुठें नभ कुठें जलसीमा होई
नभांत जल तें, जलांत नभ तें संगमुनी जाई

खरा कोणता सागर यांतुनि वरतीं कीं खालीं
खरें तसें आकाश कोणतें, गुंग मती झाली

आकाशींचे तारे सागरिं प्रतिबिंबित होती
किंवा आकाशीं हे बिंबति सागरिंचे मोती

किंवा आकाशचि हें सगळें कीं, सागर सगळा
भवसागर बोलती पुराणीं प्रथित ऋषी ज्याला

*  *  *

हे चांदणि ! सुखशीतल गमसी तशीच असशीना
आगेचि लागो लोळ आगिचा तुजसी वदत्यांना

विमल विरल मेघांची दुलई ओढुनि निजलीसे
अशा अप्सरेचिया अनावृत वदनासम विलसें

आल्हादक किति चंद्रबिंब हें नंदसुधा झरतें
फुटो भिंग तें भिकार त्या जें मसणासम करतें

चंद्र चांदण्या असेंच अंतर मापुनि देवानें
खचल्या नभिं नी नयनीं कांचा सुललित बेतानें

त्याचें रिझवो रूप जना कीं आल्हादक कोळें
फुटोत ते त्या विद्रुप करिते दुर्बिणिचे डोळे

* * *

कथिति ज्योतिषी तसे आजिचे लोळ कुणी तारे
असतिल दुसरे, नव्हेत हे, हे अमृत-बिंदु सारे !

कीं जैं असुरां-सुरांमधें क्षीराब्धि-मथनकालीं
अमृत-कलश वरि येतां ओढाताण सबळ झाली

ओढाताणिंत इतस्ततः त्या अमृत-बिंदु गळले
तयांचि तारे म्हणुनि ज्योतिषी भले भले चकले

कीं बघुनी अप्सरो-गणें हीं वसुधेवरि खालीं
चमेलि, जाई, जुई, मोगरा, मालतिही फुलली

---

१ ह्या चिमकुल्या चांदण्या नसून हे मोठमोठे ज्वालागोल-आगीचे डोंब आहेत असें जें ज्योतिषशास्त्रज्ञ सांगतात त्यांच्या त्या शोधाला आग लागो. २ दुर्बिणीचें भिंग ; कारण दुर्बिणीनें चंद्र हा एक ओसाड, रुक्ष नि निर्जीव उपग्रह आहे असें दिसतें.

त्यांच्या नंदन-वनिंहि असावीं ऐशीं काम्य फुलें
यास्तव पेरुनि देति अप्सरा हास्य नभीं अपुलें

हास्य-लते सुरसुहासिनींच्या आलीं ऋतुंत फुलें
तयांचि तारे म्हणुनि ज्योतिषी भले भले चकले

थवे काजव्यांचे कीं नंदनवनिंच्या चकचकले
तयांचि तारे म्हणुनि ज्योतिषी भले भले चकले

सुनील शालूवरि मायेच्या[1] लकलकती टिकले
तयांचि तारे म्हणुनि ज्योतिषी भलेभले चकले

सुवर्ण-गौरा-गौरी श्रीहर लीलारत झाले
थाप पडे तों द्वारीं श्रीहरि भेटाया आले

नग्ना लगबग गिरिजा धांवे सावरुं शालूला
हिसका बसुनी हार गळ्यांतिल तटकन तो तुटला

त्या हारांतिल मोतीं सैरावैरा ओघळले
तयांचि तारे म्हणुनि ज्योतिषी भलेभले चकले

दशाननें पळवूनि जानकी नभःपथें नेली
अश्रुबिंदु जे देवी टपटप ढाळित त्या काळीं

तेचि राहिले असे चकाकत जाणों दिव्यबलें
तयांचि तारे म्हणुनि ज्योतिषी भलेभले चकले

आकाशाच्या ग्रंथ-संग्रहालयासि अर्पियला
कालें[2] ग्रंथ प्रचंड विश्वेतिहास जो लिहिला

---

१ माया म्हणजे प्रकृतिदेवी. २ विश्वेतिहासाचा प्रचंड ग्रंथ काळानें लिहिला, कारण विश्वाच्या इतिहासाची माहिती काळापेक्षां कोणाला जास्त असणार ? आणि त्या विश्वेतिहासाच्या प्रचंड ग्रंथाला पुरेसें ग्रंथालय म्हणजे एकच आकाश.

रौप्यमुद्रिकांकित तद्भागां अनुक्रमें रचिलें
तयांचि तारे म्हणुनि ज्योतिषी भलेभले चकले

*  *  *

परी सागरा, सांग काय ही लटपट ? ही कुठली
चटकचांदणी कवण ? नभांतुनि निसटुनिया विपलीं

रात्रीं ऐशा अशी एकटी लगबगिनें घुसली
तुझिया जलमंदिरीं सर्वेंची दिसेनशी झाली

लाजुं नको, जा भोग विलासा कामोत्सुक तूं, ती
तुझिया शतजल[1]तरंगमंजुल सुखा साथ दे ती

प्रेमाची चांदणी परंतू ज्यांची दूर वसे
किती प्रवासी तळमळती बा, तुझ्या निकट ऐसे

तुझा तुझ्या चांदणिशीं पाहुनि प्रिय संगम साचा
तव मत्सर ना, परी छळी त्या वियोग दयितांचा !

*  *  *

हे ताऱ्यांनों, जाणतसां का कुठुनि तुम्ही आलां ?
कुठें चाललां कवण हेतु ह्या असे प्रवासाला ?

कवण हेतु तो ज्यास्तव तुम्हीं गगनगामि व्हावें
सूर्यापासुनि इतुकें दूरचि भूनें विचरावें

गजराजाहुनि फुलपांखरुंची सुरंग शोभावें
बीज फुलावें, फुलुनि सुकावें, सुकुनि बीज व्हावें

लहान मोठीं घटिका-यंत्रीं बहुविध यंत्रें तीं
स्वस्वगतीनें परि एक्याची साध्यास्तव फिरती

---

१ श्लेषानें ' जलतरंग ' वाद्यें.

असा कोणता हेतु जयाच्या सिद्धीस्तव साचीं
विश्वाच्या या चक्रें फिरती भव्य घड्याळाचीं

अम्हां कळेना म्हणूनि पुसतों तुम्हां कळे का तें
का न कळत वर्तावें जाणति इतकेंची ज्ञाते !

समुद्रमार्ग, १९०६

## २५ श्रीमान् राजे कृष्णशहा यांस[1]

[ श्लोक

यद्यद् विभूति-द्युतिमत्सुसत्त्वं
तत्तद् मदात्म-प्रभवं शृणु त्वम्
इति स्वयं श्रीभगवान् प्रसिद्धं
गीता-वधू-रत्नमुवाच तत्त्वम्

श्रीमान् नृपा ! तूं द्युतिमान् तसाची
विशिष्टता व्यक्त तुझ्यांत साची
चिदंश ते यास्तव ईश्वराचे
रूपीं तुझ्या व्यक्त असावयाचे

पट्टाभिषिक्ता ! स्वयमेव आणी
सक्षेम कीं ती तव पट्टराणी
कीं मौक्तिकीं, त्या सरितांत, आणी
तुझ्या कृपाणांत सतेज पाणी[2] ?

परस्परालिंगन-लालसा ती
नृपाल-राज्ञी विसरोनि जाती
सस्पर्ध यच्चुंबन जैं कराया
वर्धिष्णु कीं तो युवराज राया ?

---

१ जव्हार संस्थानचे अधिपति. २ हा श्लिष्ट शब्द. तेज, जल आणि धारेची तीव्रता असे तीन अर्थ अनुक्रमें.

कीं कान्त-कंठीं विलसे सलीला
चंपावती चंपक-पुष्पमाला
श्रीराजबंधु प्रमुखास राया
सुदक्ष कीं लोकहिता कराया ?

कीं द्रव्य आणी गुण ते निधींनीं
प्रपूर्ण ऐशी तव राजधानी
गुणज्ञ, वेत्ता, अधिकार-भारी
समर्थ कीं तो तव कारभारी ?

लता तरू संगमिं हांसती कीं ?
रता स्वकांतासि महासती कीं ?
सुदुग्ध कीं वत्ससहीत गाई ?
तुझें नभीं कीं खग गीत गाई ?

बंडासि दंडोनि प्रजा उदंड
आनंदवी कीं तव राजदंड ?
नराप्रती पाळुनियां त्रिकाल
यथार्थ कीं त्वत्पदवी नृपाल ?

आणी पवित्रा पदवी अशी ही
नृपा तुला जो जगदीश देई
तया चरित्र प्रभु राघवाचें
अहर्निशीं वाचिसि कीं स्ववाचे ?

सिंधूमधें राक्षस-बेट लंका
दे रावणा जन्म जगत्कलंका
गांजी बळें आर्य-वसुंधरा ही
माता नृपा आपुलि सुंदराही

१ कोशांत.

भूक्रंदनें राघव चापपाणी
सलज्ज आणी नयनांस पाणी
म्हणे "रिपूनें उपमर्द केला
धिक्कार माझ्या तरि जीविताला

बटीक जाती असतांहि हाय
राजा मला मी म्हणवीत काय
छातीवरी रावण हाणि लाथा
घालूं तरी कीं मुकुटासि माथा ?"

शत्रूवरी श्रीरघुनाथ घाला
घालावयाला चिर सज्ज झाला
छाटी अरीच्या दशकंधराही
करी स्वयें मुक्त वसुंधरा ही

चरित्र उद्बोधक राघवाचें
चरित्र उत्तेजक राघवाचें
चरित्र सांकेतिक राघवाचें
अहर्निशीं वाचिसि कीं स्व-वाचे ?

नृपा तुला तो जगदीश देई
सद्राजवंशीं जनु पुण्यदायी
तूं भाग्यशाली तुजवीण पाहीं
तुझ्या प्रजे आश्रय अन्य नाहीं

म्हणोनि एक्या करिं मागणीतें
स्वार्थार्थ कांहीं न लगे मला तें
कगी तुम्हीं तें मज काय केलें
व्हावें तरी मन्मन हें भुकेलें ?

लंडन, १९०६

परंतु कीं आर्य-वसुंधरा ही
माता नृपा आपुलि सुंदरा ही
गेलें तिचें तें तिज द्यावयातें
झटेन ह्या दे वचनासि मातें

[ आर्या

दुर्गम जव्हारच्या त्या रानींचा व्याघ्र जो महाराणा
श्रीकृष्ण शहा त्यांच्या राजसभे हा मदीय नजराणा

लंडन, १९०७

## २६ हिंद सुंदरा ती !

[ चाल : घेउनि ये पंखा

हिंद सुंदरा ती, वसुंधरा । धन्य-प्रसवा ती ।। ध्रुव० ।।

ऋग्यजुःसामवेदा । उदनिषत् ज्ञान छंदा
प्राचीना गायत्री । देवी संधात्री १

भरद्वाज जनका । वसिष्ठ शुकसनका
श्रीगर्गा ऋषिवर्गा । अशां जन्मदात्री २

रामायणकविला । श्रीमत् वाल्मिकिला
व्यासातें शिकवीते । बोल बोबडे ती ३

रघु नल दाशरथी । धर्मराज नृपती
हे मातर् ! हे मातर् । वदुनि जिला नमिती ४

गार्गेयी विदुला । सीता द्रौपदिला
झांशीच्या लक्ष्मीला । उद्भव दे पोटीं ५

गौतम चैतन्या । गुरू नानकांना
स्तन्य जिचें धन्य करी । त्रिजगन्मान्या ती ६

प्रताप शिव बंदा । श्रीगुरु गोविंदा
संभव दे उद्भव दे । दे जी उत्स्फूर्ती ७

शास्त्रांची सुखनी । सुकलांची नलिनी
सुजल जला, सुफल फला । रुचिर रस-स्रवती ८

देइ अशां प्रसवा । जिचा धन्य कुसवा
वसुमति ती दासी कां । क्षण तरि राहो ती ? ९

सूर्यग्रहणाचें । आयुः क्षण साचें
भास्वरची, अमर सदा । रविमंडळदीप्ती १०

शीघ्रचि होइल ती । मुक्ता शुभमूर्ती
स्वतंत्र ती, समर्थ ती । विश्वोद्धरणा ती ११

लंडन, १९०८

## २७ प्रियकर हिंदुस्थान

[ चाल : म्हातारा इतुका

सकल जगामाधिं छान । अमुचें प्रियकर हिंदुस्थान
केवळ पंचप्राण । अमुचें सुंदर हिंदुस्थान ॥ ध्रु० ॥

बहुत पाहिले बहुत ऐकिले देश परी ते सान
सान मिसर पाताल आंग्लभू सान चीन जापान १

बहुत गिरि, परी तुझाच गिरिवर हिमालयाचा मान
कवण नदी दे श्रीगंगेसम पूत सुधाजल-पान २

कस्तूरी-मृग-परिमल-पूरित जिचें फुलावें रान
प्रभात-कालीं कोकिल-किलकिल-कूजित आम्रोद्यान ३

यज्ञ-धूम-सौगंध-मनोहर जिचें सामरव-गान
ऐकुनि येती जिथें कराया देव सोमरसपान ४

कालिदास कवि गाती, गौतम शिकविति सांख्यज्ञान
म्लेंच्छ-विनाशक विक्रम दे तुज स्वातंत्र्यश्रीदान ५

जिजा जन्म दे शिवा[1] जिच्यास्तव गुरु[2] पुत्रांचे प्राण
जिच्यास्तवचि त्या कुमारिकांसी[3] विस्तवांत ये न्हाण ६

तुझ्या जळांहीं अनंत पितरां दिलें तिलांजलि-दान
पुण्यभूमि तूं! पितृभूमि तूं! तूं अमुचा अभिमान ७

जननि! जगत्त्रयिं शक्त कोण जो करिल तुझा अपमान
प्राणदान-संसिद्ध असुनि त्वत्-त्रिदश-कोटि संतान? ८

जननि! तुझ्या सन्मान-रक्षणीं अर्पु रणीं हे प्राण
शत्रुकंठ भंगोनि घालुं तुज दारुण रक्तस्नान ९

लंडन, १९०८

---

१ शिवाजीस. २ गुरु गोविंदसिंग यांच्या चारही बालसुतांस धर्मकार्यार्थ बळी पडावें लागलें. पैकीं दोघां दहा बारा वर्षांच्या मुलांस मुसलमानांनीं ते मुसलमान होईनात म्हणून भिंतींत चिणून मारलें. दोघे लढाईत गुरुजींचे आज्ञेवरून घुसून अभिमन्यूसारखे लढत लढत मेले. ३ चितोडच्या वीरकन्यकांस.

## २८ प्रभाकरास

**परिचय**—विनायकरावांचा पहिला मुलगा प्रभाकर हा चार वर्षांचा होऊन लहानपणींच वारला. ती वार्ता युरोपमध्यें कळली तेव्हां त्याच्या स्मृत्यर्थ त्यांनीं ही कविता रचली.

[ चाल : चंद्रकांत राजाची०

परिसुनि यौवन-लतिकेला तूं पहिलें फूल फुले
तनया, तनु थरथरली स्नेहें नेत्र स्निग्ध झाले

परंतु अमुचें अभिनव यौवन, त्यांत पितृत्वाचा
प्रथम समागम, गमुनी लज्जा-विनय मना साचा

नवप्रसव तव जननी मजला दावित असतांही
गुरुजन-मर्यादेनें म्यां बहु पाहियलें नाहीं

चोरुनि घ्यावें कधीं कधीं तव अर्ध-चुंबनातें
सुखोत्सवें तंव आपण होउनि नयन झांकती ते

प्रभ्या प्रियकरा, होतासी बहु दिवस असा सख्या
अमूर्त तूं कल्पना एक मधु-मधुर अशी हृदया १

शीघ्रचि सोडुनि अंक जननिचा दुडुदुडु धावत तूं
घरांत फिरतां डोळे भरुनी पाहिन हा हेतू

धरुनि मनीं मी उत्सुक असतां विदेश-गमनाचें
प्रभ्या प्रियकरा ! कार्य उदेलें प्रियजन-विरहाचें

मातृस्तनपानांत दंग तूं असतांना तुजला
तव जननीसह चुंबुनि केलें विदेश-गमनाला

अंतरतां मज प्रीति-तरु-लता खेद अती झाला
सत्य सांगतां, परी न गमला बहु तव विरह मला

देशिं जसा होतास विदेशीं सन्निधची सखया
अमूर्त तूं कल्पना एक मधुमधुर अशी हृदया २

अतनु मूर्ति तव लटकुनि कितिदां हृदयाशीं निजली
हसली कितिदां दिव्याशेनें कितिदां ती सजली

धर्म-कार्य-सिद्ध्यर्थ धाडुनी रणीं खड्गपाणि
बाल बाल-झुंजार आपुले श्रीगोविंदांनीं

हुतात्म होतां हसत पाहिले सुकीर्ति परिसुनि ती
म्यांहि कितीदां रणीं पाहिली अमूर्त तव मूर्ती

एके समयीं प्रभ्या प्रियाळा! विषम वृत्त आलें
वसंतविव्हल लतातरू ते विव्हल बहु झाले

मृत्यु-वंचकें हरुनि मूर्ति तव वंचित त्यां केलें
परी सत्य सांगतां न कांहीं हरूनि मम नेलें

पूर्वि जसा होतास असासि तूं नंतरही सखया
अमूर्त तूं कल्पना एक मधु-मधुर अशी हृदया ३

हृदय जोंवरी प्रभ्या प्रियाळा, असाचि तिथ राहे
पूर्णार्जित मद्-हृदय गृह असे तुझेंचि तनया हे

परि जैं वारे क्रुद्ध वर्षती मेघ-शिला-धारा
सुरक्षित न हें गमे गृह सख्या तुझिया आधारा

---

१ सांगायचें तर. २ गुरुगोविंदसिंग यांनीं. ३ मैत्रिणी व मित्र.

महाराष्ट्र-वाक्सुंदरीसवें श्रीगोविंदातें
विहार जेथें अखंड सुंदर-मणिमयमंदिर तें

तुला गेह हें यास्तव अर्पी सरस्वती स्वकरें
जिथें क्रांतिचे शिवूं न शकती अग्नि-मेघ-वारे

अमर-मंदिरीं नांद सदोदित सलील बाळा, या
अमूर्त तूं कल्पना एक मधु-मधुर अशी हृदया ४

लंडन, १९०९

पश्चाल्लेख

जिथें न शकती शिवूं भासले अग्नि मेघ वारे[१]
तिथेंहि शकले शिवूं क्रांतिचे अग्नि-मेघ बा रे

अंदमान, १९१२

---

१ क्रांतीच्या झंझावातांत हें माझें हृदय—हा देह सांपडलेला म्हणून—तुला राहण्यास सुरक्षित नाहीं. म्हणून तुझी स्मृति चिरकाल सुरक्षित राहावी यास्तव गोविंदसिगाच्या पराक्रमाचा गौरव ज्या शीखेतिहासांत आहे त्या इतिहासाचा मराठींत रचलेला जो ग्रंथ मीं लिहिला तो तुझ्या नांवें अर्पण करतों. म्हणजे तो ग्रंथ आहे तों तुझी स्मृति राहील. अशा भावनेनें ही कविता अर्पणपत्रिका म्हणून लिहिली. २ परंतु सावरकरांचा तो शीखेतिहासही जप्त झाला. प्रसिद्ध होण्यापूर्वीच हस्तलिखित धरलें गेलें. क्रांतीच्या आगींत जें स्थान सुरक्षित वाटलें तेंही त्या आगींत दग्ध झालें. त्या आश्चर्याचा ह्या पश्चाल्लेखांत उल्लेख आहे.

## २९ सागरास

**परिचय**—अभिनवभारत या संस्थेवर वक्रदृष्टि झाल्यामुळें अतःपर आपल्याला हिंदुस्थानला परततां येणार नाहीं व आपण लवकरच धरले जाऊं असें विनायकरावांस निश्चितपणें वाटलें. त्या वेळीं समुद्रकांठीं ते गेले असतां स्वजनांची आठवण होऊन त्यांनीं ही कविता लिहिली.

[ चाल : अजि अक्रुर ह्या

ने मजसी ने परत मातृभूमीला । सागरा, प्राण तळमळला
भूमातेच्या चरणतला तुज धूतां । मीं नित्य पाहिला होता
मज वदलासी अन्य देशिं चल जाऊं । सृष्टिची विविधता पाहूं
तइं जननी-हृद् विरहशंकितहि झालें । परि तुवां वचन तिज दिधलें
मार्गज्ञ स्वयें मीच पृष्ठिं वाहीन । त्वरित या परत आणीन

विश्वसलों या तव वचनीं । मी
जगदनुभव-योगें बनुनी । मी
तव अधिक शक्त उद्धरणीं । मी

येईन त्वरें कथुन सोडिलें तिजला । सागरा, प्राण तळमळला १

शुक पंजरिं वा हरिण शिरावा पाशीं । ही फसगत झाली तैशी
भूविरह कसा सतत साहुं या पुढती । दशदिशा तमोमय होती
गुण-सुमनें मीं वेचियलीं या भावें । कीं तिनें सुगंधा घ्यावें
जरि उद्धरणीं व्यय न तिच्या हो साचा । हा व्यर्थ भार विद्येचा

ती आम्रवृक्षवत्सलता । रे
नवकुसुमयुता त्या सुलता । रे
तो बाल गुलाबहि आतां । रे

फुलबाग मला हाय पारखा झाला । सागरा, प्राण तळमळला २

नभिं नक्षत्रें बहुत एक परि प्यारा । मज भरतभूमिचा तारा
प्रासाद इथें भव्य परी मज भारी । आइची झोपडी प्यारी
तिजवीण नको राज्य, मज प्रिय साचा । वनवास तिच्या जरि वनिंचा

भुलविणें व्यर्थ हें आतां । रे
बहु जिवलग गमतें चित्ता । रे
तुज सरित्पते ! जी सरिता । रे

तद्विरहाची शपथ घालितों तुजला । सागरा, प्राण तळमळला ३

या फेन-मिषें हंससि निर्दया कैसा । कां वचन भंगिसी ऐसा ?
त्वत्स्वामित्वा सांप्रत जी मिरवीतें । भिउनि का आंग्लभूमीतें ?
मन्मातेला अबल म्हणुनि फसवीसी । मज विवासनातें देशीं

तरि आंग्लभूमि-भयभीता । रे
अबला न माझिही माता । रे
कथिल हें अगस्तिस आतां । रे

जो आचमनीं एक क्षणिं तुज प्याला । सागरा, प्राण तळमळला ४

ब्रायटन, १९०९

## ३० सांत्वन

**परिचय**—१९०९ सालाच्या जून महिन्यांत श्री. गणेशपंत सावरकरांना जन्मठेप काळेपाण्याची शिक्षा व लवकरच पुढें त्यांचे धाकटे बंधु " बाळ ' ( डॉ. सावरकर ) यांसही अटक झाली ! या दोन्ही बातम्या गणेशपंतांच्या पत्नी यशोदाबाई यांनीं विनायकराव यांना विलायतेस कळविल्या. तेव्हां निराधार व संत्रस्त झालेल्या आपल्या दुःखी भावजयीस त्यांनीं घाईघाईनें हें उत्तर लिहून टाकलें.

[ ओवी

जयासी तुवां प्रतिपाळिलें । मातेचें स्मरण होऊं न दिलें
श्रीमती वहिनी वत्सले । बंधु तुझा तो तुज नमीं

आशीर्वादपत्र पावलें । जें लिहिलें तें ध्यानीं आलें
मानस प्रमुदित झालें । धन्यता वाटली उदंड

धन्य धन्य आपुला वंश । सुनिश्चयें ईश्वरी अंश
कीं रामसेवा-पुण्य-लेश । आपुल्या भाग्यीं लाधला

२

अनेक फुलें फुलती । फुलोनियां सुकोन जाती
कोणीं त्यांची महती गणती । ठेविली असे ?

परी जें गजेंद्रशुंडेनें उपटिलें । श्रीहरीसाठीं मेलें
कमलफूल तें अमर ठेलें । मोक्षदातें पावन

त्या पुण्य गजेंद्रासमची । मुमुक्षु-स्थिती भारतीची
करुणारवें ती याची । इंदीवरश्यामा श्रीरामा

स्वोद्यानीं तिनें यावें । आपुल्या फुलास भुलावें
खुडोनियां अर्पण करावें श्रीरामचरणां

धन्य धन्य आपुला वंश । सुनिश्चयें ईश्वरी अंश
श्री-राम-सेवा-पुण्य-लेश । आपुल्या भाग्यीं लाधला

३

अशींच सर्व फुलें खुडावीं । श्रीरामचरणीं अर्पण व्हावीं
कांहीं सार्थकता घडावी । या नश्वर देहाची

अमर होय ती वंशलता । निर्वंश जीचा देवाकरितां
दिगंतीं पसरे सुगंधता । लोकहितपरिमलाची

सुकुमार आमुच्या अनंत फुलां । गुंफोनि करा हो सुमन-माला
नवरात्रीच्या नवकाला । मातृभूमी वत्सले

एकदां नवरात्र संपली । नवमाला पूर्ण झाली
कुलदेवी प्रकटेल काली । विजयालक्ष्मी पावन

४

तूं धैर्याची अससी मूर्ति । माझे वहिनी, माझे स्फूर्ति
रामसेवाव्रताची पूर्ति । ब्रीद तुझें आधींच

महत्कार्याचें कंकण धरिलें । आतां महत्तमत्व पाहिजे बाणलें
ऐसें वर्तन पाहिजे केलें । कीं जें पसंत पडलें संतांना

अनेक पूर्वज ऋषीश्वर । अजात वंशजांचे संभार
साधु साधु गर्जतील । ऐसें वर्तणें या काला

लंडन, १९०९

# ३१ माझें मृत्युपत्र

**परिचय**—१९१० च्या मार्चमध्यें विनायकराव विलायतेंत पकडले गेले. तेव्हां या जन्मांत जिची पुन्हा भेट होणें जवळ जवळ असंभवनीय झालेलें होतें त्या आपल्या पूजनीय वहिनीस आपल्या अटकेच्या वृत्तकथनाचा कुठारघात करण्याचें कटुकर्तव्य करतांनाच त्यांतील उदात्त आकर्षक दिव्य मर्म व्यक्त करण्यास्तव विनायकरावांनीं लंडनमधील ब्रिक्स्टन जेलमधून आपल्या या जन्मांतला बहुधा शेवटचा होऊं पाहणारा हा निरोप–हें मृत्युपत्र–लिहून धाडिलें होतें.

[ वसंततिलका

वैशाखिंचा कुमुदनाथ नभांत हांसे
यच्चंद्रिका धवल सौधतलीं विलासे
घाली स्वयें जल जिला प्रिय बाळ लोभें
जाई फुले, परिमलें सुमनांत शोभे

आले घरीं सकल आप्त-सुहृद् जिवाचे
आनंदमग्न कुल गोकुल काय साचें
आदर्श दीप्ति-शुचिता-धृति-यौवनांचें
पाहूनि जें तरुणमंडळ, कीर्ति नाचे

प्रेमें हृदें विकसलीं नव यौवनाच्या
गंधें सुवासित उदात्त सुसंस्कृतीच्या
दिव्या लता-तरुंसि जें गृह बाग झाला
ज्या पौर हर्षित वदे जन ‘ धर्म-शाला ’

सैंपाक त्वां निजकरें कुशलें करावा
प्रेमें तुझ्या अधिकची सु-रसाल व्हावा
संवाद सर्व मिळुनी करितां नितांत
जेवावयासि बसलों जइं चांदण्यांत

श्रीरामचंद्र-वनवास-कथा रसाला
कीं केविं देश इटली रिपुमुक्त झाला
तानाजिचा समरधीर तसा पवाडा
गावा चितोरगड वा शनवारवाडा

झाली कशी प्रियकरा अपुली अनाथा
दुर्दास्यखिन्न शरभिन्न विपन्न माता
शोकें विवंचुनि तिच्या जइं मोचनाचे
केले अनंत तरुणां उपदेश साचे

झाल्या तदा प्रियकरांसह आणभाका
त्या सर्व देवि वहिनी स्मरती तुम्हां का ?
' बाजी प्रभू ठरुं ' वदे युवसंघ सर्व
' आम्ही चितोरयुवती ' युवती सगर्व

कीं घेतलें व्रत न हें अम्हिं अंधतेनें
लब्धप्रकाश इतिहास-निसर्ग-मानें
जें दिव्य, दाहक म्हणूनि असावयाचें
बुद्ध्याचि वाण धरिलें करिं हें सतीचें

२

ज्या होति तैं प्रियजनांसह आणभाका
त्यांतें स्मरोनि मग सांप्रत हें विलोका
नाहीं पुरीं उलटलीं जरि आठ वर्षे
तों कार्यसिद्धि इतुकी मन कां न हर्षे ?

आसेतु-पर्वत उचंबळला प्रदेश
वीराकृती धरित टाकुनि दीनवेष
भक्तांचिया रघुपदीं झुलताति झुंडी
जाज्वल्य होयहि हुताशन यज्ञकुंडीं

तो यज्ञ सिद्ध करण्यास्तव उग्र दीक्षा
जे घेति येइ तइं तत्कृतिची परीक्षा
" विश्वाचिया अखिल मंगल-धारणाला
बोला असे कवण भक्ष्य हुताशनाला ? "

आमंत्रण प्रभु रघूत्तम सोडितां हें
दिव्यार्थ, देव ! अमुचें कुल सज्ज आहे
हे साध्वि, गर्जुनि असें पहिल्या हवीचा
हा ईश्वरीं मिळविला अम्हिं मान साचा

धर्मार्थ देह वदलों ठरलें नितांत
ते बोल फोल नच बालिश बायकांत
ना भंगली भिउनियां धृति यातनांना
निष्काम-कर्मरति योगहि खंडिला ना

ज्या होति तैं प्रियजनांसह आणभाका
केल्याचि सत्य कृतिनें अजि ह्या विलोका
दीक्षानलांत निजमातृ-विमोचनार्थ
हा स्वार्थ जाळुनि अम्ही ठरलों कृतार्थ

३

हे मातृभूमि ! तुजला मन वाहियेलें
वक्तृत्व वाग्विभवही तुज अर्पियेलें
तूतेंचि अर्पिलि नवी कविता रसाला
लेखाप्रती विषय तूंचि अनन्य झाला

त्वत्स्थंडिलीं ढकलिलें प्रिय मित्रसंघा
केलें स्वयें दहन यौवन-देह-भोगां
त्वत्कार्य नैतिक सुसंमत सर्व देवा
तत्सेवनींच गमली रघुवीर-सेवा

त्वत्स्थंडिलीं ढकलिली गृहवित्तमत्ता
दावानलांत वहिनी नवपुत्रकान्ता
त्वत्स्थंडिलीं अतुल-धैर्य वरिष्ठ बंधु
केला हवी परमकारुण पुण्यसिंधु

त्वत्स्थंडिलावरि बळी प्रिय बाल झाला
त्वत्स्थंडिलीं बघ अतां मम देह ठेला
हें काय, बंधु असतों जरि सात आम्ही
त्वत्स्थंडिलींच असते दिधले बळी मीं

संतान या भरतभूमिस तीस कोटि
जे मातृभक्ति-रत सज्जन धन्य होती
हें आपुलें कुलहि त्यांमधि ईश्वरांश
निर्वंश होउनि ठरेल अखंड-वंश

४

कीं तें ठरोहि अथवा न ठरो परंतु
हे मातृभू अम्हि असों परिपूर्ण-हेतु
दीप्तानलांत निज-मातृ-विमोचनार्थ
हा स्वार्थ जाळुनि अम्ही ठरलों कृतार्थ

ऐसें विवंचुनि, अहो वहिनी ! व्रतातें
पाळोनि वर्धन करा कुल-दिव्यतेतें
श्रीपार्वती तप करी हिमपर्वतीं ती
कीं विस्तवांत हसल्या बहु राजपूती

तें भारतीय अबला-बलतेज कांहीं
अद्यापि या भरतभूमिंत लुप्त नाहीं
हें सिद्ध होइल असेंचि उदार उग्र
वीरांगने, तव सुवर्तन हो समग्र

माझा निरोप तुज येथुनि हाच देवी
हा वत्स वत्सल तुझ्या पदिं शीर्ष ठेवी
सप्रेम अर्पण असो प्रणती तुम्हांतें
आलिंगन प्रियकरा मम अंगनेतें

कीं घेतलें व्रत न हें अम्हि अंधतेनें
लब्ध-प्रकाश इतिहास-निसर्ग-मानें
जें दिव्य, दाहक म्हणूनि असावयाचें
बुद्धयाचि वाण धरिलें करिं हें सतीचें

लंडन. १९१०

---

१ क्षणिक उत्तेजनानें किंवा आंधळ्या अवसानानें नव्हे तर बुद्धिपूर्वक विचार करून.

## ३२ आत्मबल

**परिचय**—मार्सेलिसला बोटीवरून निसटण्याचा प्रयत्न केला, त्याचा सूड म्हणून आपला अमानुष छळ होणार या जाणिवेनें अशा छळास पुरून उरेल अशा धैर्याचा पुरवठा करण्यासाठीं कवचमंत्र म्हणून ही कविता विनायकरावांनीं रचिली.

[ चाल : चामराचे सुरावर

अनादि मी, अनंत मी, अवध्य मी भला
मारिल रिपु जगतिं असा कवण जन्मला ॥ ध्रु० ॥

अट्टहास करित जईं धर्मधारणीं
मृत्युसीच गांठ घालुं मी घुसें रणीं
अग्नि जालि मजसी ना खड्ग छेदितो
भिउनि मला भ्याड मृत्यु पळत सूटतो
खुळाऽरिपूऽ। तया स्वयें
मृत्युच्याचि भीतीनें भिववुं मजसि ये १

लोटि हिंस्र सिंहाच्या पंजरीं मला
नम्र दाससम चाटिल तो पदांगुला
कल्लोळीं ज्वालांच्या फेकिशी जरी
हटुनि भंवति रचिल शीत सुप्रभावती
आण तुझ्या तोफांना क्रूर सैन्य तें
यंत्र तंत्र शस्त्र अस्त्र आग ओकतें
हलाऽहलाऽ। त्रिनेत्र तो
मी तुम्हांसि तैसाची गिळुनि जिरवितों ! २

समुद्रमार्ग, १९१०

## ३३ पहिला हप्ता

**परिचय**—१९१० सालचा डिसेंबर. खटल्याचा निर्णय लागून फांशीची व काळेपाण्याची शिक्षा आरोपितांस होणार! विनायकरावांना सर्वांत कठोरतम शिक्षा मिळून त्यांचे स्वतंत्र आयुष्याचा अंत होणार हें पाहून त्यांनीं आपल्या बरोबरच्या देशभक्तांत जे शीघ्र सुटण्याचा संभव होता त्यांचे हस्तें आपल्या मातृभूमीस व देशबांधवांस त्यांच्या ऋणाच्या फेडीचा हा 'पहिला हप्ता' धाडला.

[ चाल : वसंतीं बघुनि

मानुनि घे साची । जननि गे । मानुनि घे साची
अल्प स्वल्प तरि सेवा अपुल्या अर्भक बालांची ॥ ध्रु० ॥

ऋण हें बहु झालें । तुझ्या स्तनींचें स्तन्य पाजुनी धन्य अम्हां केलें
ऋण तें फेडाया । हप्ता पहिला तप्त स्थंडिलिं देह अर्पितों हा
सर्वेंचि जन्मुनियां । त्वन्मोचनहवनांत हवी करुं पुनःपुन्हा काया

सारथी जिचा अभिमानी । कृष्णजी आणी । राम सेनानी

अशि तीस कोटि तव सेना
ती अम्हांविना थांबेना
परि करुनि दुष्टदलदलना

रोंविलची स्वकरीं । स्वातंत्र्याचा हिमालयावरि झेंडा जरतारी १

मुंबई, १९१०

## ३४ एकलकोंडी

**परिचय**—सप्तर्षि नांवाचें एक दीर्घ काव्य विनायकरावांनीं लिहिलें आहे. त्या काव्यांत या उताऱ्यांत मुंबईच्या डोंगरी तुरुंगांतील भयाण एकलकोंडीचें वर्णन आलें आहे.

[ आर्या

लांब नऊ न पदें जी रुंद पदें पांचही नसे पुरती ;
यद्भित्तींच्या भयसम काळें डांबर अलंकृती वरती

खिडकी ना जाळी ना एकहि खोली, अशीच अभगा, जे
बंदीशालेमधिं ही एकलकोंडी म्हणोनिया गाजे !

लोहगजांचें तिज हें दार अरुंदचि दिनींहि कुलुपातें
लावूनि बंद ठेवायासी केवल, न चक्षु घूकातें

इतुकें पूर्ण विसंगत गमती ! बाजूंसि एकही न वसे
नीचहि हो परि माणुस कोणि न बोलावया मिळे नवसें ;

तैसेंची हें जेथें तरुपल्लवही मिळे न नवसासी
अंगण अरुंद पुढती दुर्मुखलेलें, जयांत दिवसासी

वाळत उन्हांत पडती कैद्यांचीं कांबळीं अणी तरटीं
कोटावरी समोरी बांधितसे घूक कावळा घरटीं

मानव जाति-बहिष्कृत, पाहूंही ज्या मनांत द्चकावें,
एक्या राज्यास्तवही ज्या संबोधावयासि वचकावें

संवादप्रिय इतुका मनुज मनाचा निसर्ग ! पापांशीं
ऐशासही शिराणी गमते बोलावयास, जैं पाशीं

वाग्दुष्काळाच्या ह्या तळमळतो जीव कीं तुरुंगांत
चड्डी आणिक बंडी खादीची रखरखीत अंगांत

टोपी नामा पिवळी झोळी झांकीत कवच माथ्याचें,
एक चवाळें काळें, शयना कांटेरि तरट काथ्याचें

स्नाना पाना प्रातर्विधिसमयास्तवहि एकची होतें
जळपात्र, अपात्रहि जें जस्ती हस्तार्थ मापटें हो तें,

जस्ती पदक प्रतिपदिं वक्षिं पुकारित सजा सदा रुळतें,
चरणांत लोहदंडा बेडी दुस्वन भयाण खळखळते

वाळे जिचे सकीलक-कंटक, ती तीन शेर वजनाची,
खाई दैवहतांचीं सोलुनि जी कातडीं नव जनांचीं—

विलगे कटिसी ती, पद टाकूं नेदीच सहज दिवसाही,
वळतां स्वप्नीं पुसल्याविण डसतेची, न भंग लव साही

नवपद खोलीमाजीं जेवूं बैसे तिथेंचि जड कुंडी
हट्टें फुंकुनियां जी घाण, घ्राणा करीत रडकुंडी

खायासि खापराची थाली, लंगोटि ही क्वचित्, सारा
संसार आमुचा हा, शिकवी तदधिक अवश्य न पसारा

मुंबई, १९१०

## ३५ फुलबाग

**परिचय**—कमला या काव्यकथेच्या आरंभीं हें मनोहर कल्पना-विलासांनीं नटलेलें फुलबागेचें वर्णन आलें आहे.

[ अनुष्टुभ्

फुलबाग किती शोभे लहान, नटवी, करी
नटुनी थटुनी नाना नखरे वरचेवरी

हिरवाचि कधीं शालू, सित मलमलिचा कधीं
रेशमी जरतारी वा जयाच्या पदरामधीं

नित्य ताजे जिते मोती[१] पाच माणिक जन्मती
पवनेंच तसें त्यांसी नटवी डुलवी किती !

हांसतां कुंददंती ती जितमन्मथ मोहवी
सुगंध सौम्य हास्याची ज्या चोरोनी नवी नवी

कलॉं[२] एकेक या लोकीं कामिनी सकला करीं
विश्वमोहक लावण्या निज, त्या मुकुटा धरी ! १०

नौकेंत कौमुदीच्या ही नटली कितिदां तरी
बाग योजनगंधा[३] त्या वनदेव-पराशरीं

मांडवी[४] ही प्रवेशाची जाईनें विणिली जिला
फुलें हीं हसरीं ये त्या आदरीति पलोपला !

---

१ निरनिराळ्या रंगांचीं फुलें. २ कला०—कुंददंतीच्या हास्याची एकेक कला म्हणजे बागेच्या बहरांतील एकेक फूल: तें सुंदरी आपल्या केसांत खोंवून आपल्या सौंदर्यावर मुकुट चढवितात. ३ श्लेषार्थानें पराशराशीं रमलेल्या मत्स्यगंधेस उल्लेखिलें आहे. ४ कमान.

फुलें? अहा फुलें ना तीं उद्यानीं विहरावया
रात्रींत चोरुनी येतां अप्सरा, धरिलें जयां

नोंद त्या दिव्य पाप्यांची ठेवूं जाइवरी असे
चुंबनांचेंचि त्यांच्या घे देवी द्वारप हे ठसे!

वीथिका कदलींची ही उद्यानांतिल मर्मरी
तया सुरेखिल्या पंथाचिया दों तटिं शोभली; २०

येत्या जात्यावरी मर्यादेनें आनतशा शिरीं
वारी विंजणवाऱ्याशीं, आतपत्र अणी धरी;

निर्गंधते करी क्षम्या नम्रता कर जोडितीं
अशीं केळफुलें, गोऱ्या गोड केळफण्या किती,

दलें सुलोल, हीं सारीं दाटतां मिसळोनि, ते
अव्यवस्थितशी शोभा बघुनी मनिं भासतें

कालिंदीपुलिनामाजीं जयांहीं उपभोगिला
यथेच्छ वनमालीसी; पूर्त, तृप्त, सुशीतला,

भुक्तकामा, रतिश्रांता, आत्मा एक जयां हरी-
सखी म्हणुनि ज्या झाल्या, समतृप्त परस्परीं ३०

विगतेर्पा म्हणूनिया, जातां वल्लभ त्याच का
तशा शून्यमना मार्गीं उभ्या ह्या व्रजगोपिका?

कंठांत एकमेकींच्या घालुनी करपल्लवा,
जातांही हरि तैशाचि कुड्मलांजलि अन्य वा

---

१ साध्या अपराध्यांचे आंगठ्यांचे ठसे घेतात. पण चोरींत सांपडलेल्या अप्सरांच्या, त्या दिव्य अपराधी म्हणून, चुंबनांचेच ठसे द्वारपालिकांनीं घेतले. तेच फुलांसारखे भासत होते. २ ओळ.

लोल कोमल पंख्यांसी कुणी पालवितां[1] करीं,
गालगालांसि लावोनी मागली पुढती वरी

हेमगौरमुखा कोणी सनाल अपुल्या सखी
स्कंधीं सखीचिया ठेवी पाठिशीं लगटूनि कीं!

शेवंती[2] ही, हरी गेला चढाई करुनी तदा
कुसुमाकर कीं कल्पी ढाल ही कुसुमायुधा! ४०

आणि हे सोनचांफ्या, तूं शिकलासि तरी कुठें
ही दिव्य किमया? आम्हां स्वयंमन्य नरां जिथें

रुप्याचेंही करायासी जड स्वर्ण न साधतें,
ओल्या मातींत सूर्याचीं किरणें पिळुनी तिथें

मृदुचेतन सोन्याचीं, स्वर्णचंपक, हीं फुलें
सुगंधी तुज पाहोनी निर्मितां मन हें भुले!

प्रियाची सोनचांफ्याची, चमेली किति ही खुले
तो तिच्यावरि ती त्याच्यावरतीं उधळी फुलें!

जातिनें शुचिवर्णा[3] जी, जी भूपा[4] ललनाजना
याचकांच्या सदा झुंडी झुलती मधु-भोजना ५०

---

१ हे आणि मागील ओळींतील शब्द केळींच्या आणि गोपींच्या दुहेरी वर्णनास एकत्र व्यक्तविणारे द्व्यर्थी आहेत. २ शेवंतीचें फूल; शंकरावर चढाई करून मदन गेला तेव्हां त्या कुसुमायुधाच्या हातांत वसंतानें ही ढाल दिली असावी. ३-४ हे शब्द आणि पुढील सारें वर्णन केतकीच्या आणि कोण्या दानशूर प्रथितयश महिले-च्या वर्णनास एकत्र व्यक्तविणारें असें द्व्यर्थी आहे. जसें शुचिवर्णा: रंगानें निर्मळ किंवा उच्च वर्णीय, शुद्ध कुलांतली.

दानशूर जिच्या दारीं; देवाच्या सुभगा पदा–
कीं शशी स्वकला तैशी–शकला तनुच्या सदा

अर्चीं जी अर्पुनीः साधूं स्वार्थ? ना लवलेश ना
परी केवळ कल्याणा लोकांच्या, मुनिसाधना

करूं सांगे तयां देऊं मोक्ष मुक्ति पडे गळां
गौरी गौरीहराच्या जी निष्कामा; अजि तूं बरा

तया ह्या केतकीच्या, हे गंधवाह! दिशा दिशा
प्रसिद्ध गुणगंधाच्या करिसी धवला यशा

आणि मात्र यशासीची! खरी खोटि कशी परी
उक्ति कुत्सित कीं हीच्या भुजंगं[3] लपती घरीं    ६०

अत्राक्षरहि ना तीचें वदतां! तुज तेंच कीं,
पावना पवना, शोभे! स्वार्थविन्मुखता निकी

ही ज्यांची, मंगल लाखों लोकांच्या झिजती, जया–
विना वसुंधरा व्हावी अल्परत्ना, अशा तयां

जगद्धर्मी महात्म्यांच्या गृहस्खलित मानिती
स्पृहणीय न तत्रापी गोपनीयचि सन्मती!

पुन्हा हुडकितां मातें फिरे काय असा अतां
क्रुद्ध हा त्या त्रिनेत्राचा तिजा नेत्रचि जाळिता:

पाहूनि भास्करा भारी खाई धास्ति अनंगही,
कीं दुःखें पोळली जिव्हा पी ते फुंकुनि ताकही    ७०

---

१. चंद्र देवांना एकेक कला पिऊं देतो; केवडासुद्धां एकेक पान देवाला वाहूं देतो. २ गौरी गळ्यांत पडली तरी गौरीहर विरागी, त्याहून, हे वाऱ्या तूं बरा; कारण केतकी गळ्यांत पडतांच तिचा सुगंध तूं दिशादिशांत पसरवितोस. ३ साप किंवा प्रच्छन्न प्रियकर.

म्हणूनीच गमें नेमी मीनकेतन हा खुळा
गुप्त हेरचि सूर्याच्यावरी, सूर्यफुला, तुला !

तरीच तूं सदा डोळा ठेवितोसि रवीवरी
अनंग तरिची दंगा भारी रात्रिंतुनी करी !

नाना बालतरू देशा-विदेशांतिल आणुनी,
फुलें किती अशीं ज्यांचीं पानें रंगित देखणीं.

तशींच फुलझाडेंही विचित्र नटवीं किती:
कुंड्याकुंड्यांतुनी होतीं गुच्छांहीं रचिलीं पथीं.

सभोंते फुलबागेच्या वर्तुलाकृति रेखिले
तृणस्तबक जे गार हिरवे हिरवे खुले : ८०

प्रभातीं तृणवेलीसी त्यांतल्या धवलीं अती
अती चिमुकलीं, लाखों फुलेंही फुलतां किती

मनोज्ञ तरी ती शोभा ! यामिनींत, गमे हृदीं,
होती वहात जी येथें ज्योत्स्नेची रसिता नदी

प्रभातिंच्या हिमें कांती घर्नाभवन घे नवें :
चकाकती फुलें ना हीं चांदण्याचे रवे रवे !

वशीकरणचूर्णासी देत त्यास तिला हरू,
मंत्र गुंजत त्या भोगक्षमा ज्या कालिका करू

ह्या फुला त्या फुलीं राजी करवित परोपरी,
हिचें चुंबन दे त्यासी त्याचें देत हिला, अली ९०

---

१ सूर्य हा शंकराचा तिसरा डोळा असा भास होऊन त्यावर नजर ठेवण्याचें काम मदनानें सूर्यफुलाकडे सोंपविलें. सूर्य मावळतांच अर्थात् मदनाचा दंगा सुरू होतो. २ भृंग.

दयितादयितांमाजीं सुमलोकांतल्या पहा
घाली खेपा मधावारी मदनाचा दलाल हा !

धोतऱ्याचीं महादेवा फुलांत रुचलीं फुलें,
गुणांधत्वहि मोठ्यांचें मोठेंची असणें बरें !

फूल ह्या निशिगंधाचें हें अधीरवितें हृदें
कामसेनापुरोगामी रौप्यशृंगचि काय तें !

छोटेंसें स्फटिकांचें हें अष्टपैलु मधें खुले
लीलासर, सदा पूर्ण स्वादु शीतलशा जलें

कारंजें शतधारांचें कासारांत तया उडे
नृत्यबिंदुवरी त्याच्या तेजोबिंब यदा पडे १००

तदा गमे असा लीलासरा उडत ये तया
थवा इंद्रधनुष्याच्या पिलांचा विहरावया !

जलार्धमग्ननाला ह्या शोभती नलिनी तशा
शोभती लाजत्या गोपी यमुनेंत तईं जशा

हृच्चोर पोर नंदाचा वसनें हरि ज्या क्षणा
आणि त्या प्रिय पाप्याच्या हट्टी तुष्ट करूं मना

शक्य तो नग्न तन्वंगें करूनि वरती जला,
'दे ना रे हरि वस्त्रें तीं !' गोपी याचिति आकुला

—नायकेचि परी खोटा, या तशाच म्हणे, वरी
छंदें त्या कीं मृगी तैशा होत कर्पित सुंदरी ११०

आल्या तीरीं अहा, तीरावरी नवनवें तधीं
लावण्याचे पुटांतूनी पुट दिव्य पदोपदीं

घेत घेत विकासा जैं रविसी नमिलें करें;
वायु निश्चेष्ट, सूर्याचे अंशु आनत, आदरें

करीत तइं जे देवप्रिय दर्शित जाहले
विश्वमोहन मद्याचे पेले, चेतन पोवळें,

जीवनाच्या उषा ज्या, जीं हृदयें रतिचीं निर्की
प्रेमकल्पसुमें तीं हीं फुलले न गुलाब कीं !

अंदमान, १९११

## ३६ चांदोबा चांदोबा ! भागलास का ?

**परिचय**—अंदमानच्या कारागारांतील खोल्यांची बदली होतां होतां एकदां रात्रीं चंद्राची कोर दिसावी अशा खोलींत विनायकरावांची वस्ती झाली. फारा दिवसांनीं एकाएकींच चंद्राची कोर पाहून जो मनोरम आनंद झाला त्या भरांत निश्चितपणें चवाळ्यावर पडून चंद्र बघत ते कितीतरी वेळ पडून होते. त्या वेळेस अगदीं बालपणीं घरीं आणि आजोळीं चांदण्यांत लहानपणचें तें ' चांदोबा चांदोबाचें ' गाणें गात जे खेळ खेळले होते, त्यांच्या चिमुकल्या आठवणी त्यांना येऊं लागल्या. किती वेळ तरी त्या एकलकोंडींत हें मोहक ' चांदोबा चांदोबा ' चें लहानपणचें गाणें गुणगुणत असतांना वाटलेली ती कारागारांतल्या भयाण रात्रींतील क्षणिक मनोरमता या गाण्यांत गाइली आहे.

[ चाल : धिन्ना धिन्नक धीना धी

तुरुंगांत मी तदा तसा । सुखीं हरखलों स्वर्गि जसा
सायंकाळीं बंद्यांतें । कोठड्यांतुनी कोंडुनि ते

कारेचे या अधिकारी । जाती अपुल्या परत घरीं
रखवाले हे रात्रिमधीं । मारिति फेऱ्या कधींमधीं

दुष्ट स्वप्नें वायुवरी । येती जाती परोपरी
तुरुंग दगडी राक्षस हा । पचवित अन्ना गुंग पहा

मधेंच दचकुनि किंकाळी । झोंपहि मारी क्वचित् जरी
कारेची या तरी किती । निर्जन वनसम ही शांति !

लोहगजाची जी जाळी । कोठडीस मम तीखालीं
टाकुनि कांबळि मी अपुली । टाकित अंगा तों दिसली

समोरची नाभिं मज देखा । चमकत चिमुकलि शशिलेखा
' शशिलेखा ! रे शशिलेखा ! ' । माववुं शकुनि न त्या हरिखा

टाळि वाजवुनि मींच मशीं ! कथिली वार्ता अद्भुतशी
सहा सहा महिन्यांत कधीं । चंद्र दिसेना बंदिमधीं

वर्षहि न जिथें तिथी तिथें । कळणें कैशी तरिही ते
असेल पंचमिचतुर्थिची । कोर कोवळ्या चंद्राची

प्रथमचि दिसला चंद्र जना । नसेल गमला तैंहि मना
हर्ष तसा तैं मज गमला । आनंदाला भर आला
बुद्धि[1]-मनीं तैं क्षणीं परी । बोलाचाली ही झाली :

" प्रमुदें होतो । शोकचि अंतीं ! " " जातांना ती —
शशिलेखा ? । नसतां का । कधीं फुका

---

१ बुद्धि म्हणाली "तुझी जन्मगांठ दुःखाशीं मारलेली आहे म्हणून क्षणिक आनंदांत लिप्त होऊं नकोस, नाहींतर पुढें शोक होईल." मन उत्तरलें, "तें कां ? ही आनंदाची चंद्रकोर चटकन् दिसेनाशी होईल म्हणून ना ? पण दुःखाच्या अनंत अंधाऱ्या रात्रीं मीं ज्या काढल्या आणि काढीत आहे त्यांत आनंदाच्या चंद्रकोरी-साठीं ती नव्हती म्हणून, फारसा झुरत कोठें पडलों होतों ? नसली तर नसली, पण जर सहज दिसली तर मग त्या आनंदाच्या चंद्रकोरीला ती सहज दिसते आहे तोंवर, कां हंसत हंसत पाहून घेऊं नये ? नसत्या सुखासाठीं रडत बसूं नये, तसेच आपल्या सुखांतही रडत बसूं नये ! "

झुरलों मी ? मग असतां ती । येवो न मुदा कां भरती ? ”
तुरुंगांत मी तदा तसा । सुखीं हरखलों स्वर्गिं जसा !

२

आनंदाचा पूर परी । मधेंच बुडवित ती सारी
बोलाचाली नेइ मला । उंच उंच त्या उंच स्थला

पुरांत मिसळति पूर जिथें । नीलांचे[1] अणि अनिलांचे[2]
मधुर स्मृतिचे विस्मृतिचे । मोदाचे अणि कौमुदिचे

पोळ्यांतुनि त्या मधमाशा । लघु लघु नीडीं निज जैशा
गोड कल्पना तशा तदा । आनंदाचा मध खातां

मम मस्तिष्कीं[3] शत गाणीं । गुणगुणती मंजुळवाणीं
शत सनयांतुनि परि त्याही । शकूं सामवत तें नाहीं

गीत हृदिं बघे हृदंतरीं । “ ततः कुमुदनाथेन ” परी –
तान[4] कोकिली वदे कशी । मधुर स्वप्नें बुलबुलिचीं ?

‘ भ्रमर परावर्तन ’ कांहीं । एक दोन जड नांवें हीं !
फूल गुलाबा फुले कसें । तत्त्वें कां त्या समजतसे ?

---

१ कल्पनेच्या आकाशांतील नीलरंगाचे. २ वायूचे. ३ लहान लहान मज्जापिडांत त्या त्या भावभावना राहतात, जशा पोळ्याच्या घरांतून मधमाशा. ते ते मज्जापिंड डवचले गेले कीं, त्या त्या भावना आपआपलीं गीतें गुणगुणूं लागतात. ४ तसा आनंद मन सहज व्यक्त करूं लागलें. तो प्रथम ‘ ततः कुमुदनाथेन कामिनीगंड-पांडुना । नेत्रानंदेन चंद्रेण माहेन्द्री दिगलंकृता ’ या महाभारतीय श्लोकांत झाला. पण तो कोवळा आनंद त्या गंभीर वर्णाच्या जाड सूत्रांत गोंवतांना फुलारारखा चुरगळून जाऊं लागला. त्यावप्रमाणें पृथक्करणीय बुद्धि ही चांदणें म्हणजे काय याचें शास्त्रीय व्याख्यान देऊं लागली : पृथ्वीचें ‘ भ्रमण, ’ किरणाचे ‘ परिवर्तन, ’ व बुलबुलाच्या गाण्याचा उगम शोधण्यासाठीं त्या पक्ष्याचेंच पृथक्करणीय विच्छेदन जर कोणी करूं लागला तर त्यानें त्याचें मंजुळ गाणें जसें कत्तल केलें जावें तसा विश्लेषणात्मक बुद्धीनें तो आनद कत्तल केला जाऊं लागला.

त्या वासाची मोहकता । बुद्धिसि ना ती विषय हृदा
हृदयाचि तरी भाषे ही । कौमुदिची कविता गाई !

हसूं निकें अणि असूं सुखें । मुके बोल अणि बोल मुके
चुटचुटक्या अणि मिटमिटक्या । छंदी वृत्ती अशा निक्या

हृदयाची तैं भाषा ही । कौमुदिची कविता गाई
गाई कविता कौमुदिची । चांदाची चांदोबाची

'चांदोबा ! जें थिजथिजुनी । होत येत कीं हिमपाणी
धका लव जसा घनिल करी । शब्द मुदा तो हृदंतरीं

स्मरले ! स्मरले ! लुटा सुखा । "चांदोबा, चांदोबा, भागलास का ?"
ती कौमुदिची । हो हो हीची । कविता साची !

अणि वेंचे । बुलबुलिचे । स्वप्नींचे
"चांदोबा चांदोबा भागलास का ।
लिंबुणिच्या झाडाखालिं लपलास का ?"

२

हंसे चित्त हें हृदय हंसे । कसें, काय, तें कवण पुसे
बालपणींचा तो खाऊ । कोण दे कशातें पाहूं

स्तन जननीचा स्वयें जसा । हक्कचि अपुला चंद्र तसा.
पुनः पुन्हा मी लुटित सुखा । गाइं चांदोबा भागलास का ?

---

१ हृदयाच्या कवितेचीं हंसूं असूं, चुटक्यामिटक्या हींच वृत्तें आणि छंद असणार ! २ विचारपरंपरा ढिल्या संदर्भानें चालत चालत लहानपणच्या 'चांदोबा' शब्दाची आठवण झाली त्यासरशीं तें गाणें आठवलें. त्यासरशीं तो कोंवळा आनंद मनाला मनासच ऐकवितां येऊं लागला. पाणी अगदीं थंडावत थिजत येतें तेव्हां थोडें हालवितांच एकदम घनिल होतें. ३ बुलबुल स्वप्नांत जें गातात त्यांतील निवडक वेंचे.

स्मृतिचित्रें तीं विजेपरी । चमकत उठती परोपरी
" चांदोबा, चांदोबा भागलास का ।

लिंबुणिच्या झाडाखालिं लपलास का ?
लिंबुणिचें झाड करवंदी " । चलच्चित्र नव मनःपटीं !

बालपण जिथें मम जातें । जुन्या घराचें अमुच्या तें
अंगण सुंदर ज्यामाजीं । खेळवि बाळवीं आजी

तिथें शामला आमलकी । जी, सांजे तत्तलींच कीं
भावंडें अम्हि सकल बसूं । कधीं हंसूं कधीं रुसूं.

चौकाच्या त्या पूर्वदिशे । ललित लिंबुणी जी विलसे
डुलत्या पालवितूनि तिच्या । तरंगांत कीं लघुनदिच्या

होति त्याहुनि लांब अशी । दिसली एक्या सांजेशी
धार नाहत्या चांदीची । तशी कोर नव चंद्राची !

सहसाची तैं गात उठूं । टाळी बाळें अम्ही पिटूं
" चांदोबा चांदोबा, भागलास का ।

लिंबुणिच्या झाडाखालिं लपलास का ?
लिंबुणिचें झाड करवंदी । मामाचा वाडा चिरेबंदी "

' मामाचा वाडा ' मनःपटीं । विद्युच्चित्रें उठाउठीं !
मामा अमुचा प्रेमाचा । आजोळीं ज्या गृहिं साचा

त्यासचि लागुनि बांधियला । चिरेबंदि जो नव वाडा
जे मामाच्यासम प्रेमा । संतत करिती वरतिं अम्हां,

त्यांचा वाडा तो दिसला । ज्या भंवतालीं दरवळला
आजोळींच्या लाडांचा । लीलांचा अणि लोभांचा

अस्फुटसा स्मृतिपुंज मनीं । कुठुनि तरी परि विमोहुनि
फुलझेला कीं लपलेला । तसा न दिसतां दरवळला !

चांदण्याचिया त्या पाना । पीत गीतिच्या अणि ताना
मनःपटीं त्या मधुमंत्रें । चमकत चलतीं स्मृतिचित्रें

होत तया अणि बघत तया । रंगुनियां अणि गुंगुनियां
पुनः पुन्हा मी लुटित सुखा । गाइं " चांदोबा भागलास का ? "

परि कीं भासे क्षण क्षणीं । मनांतल्या मज तयीं मनीं
कीं त्या आनंदांत तशी । रसांत लपते रुची जशी

तानांच्या, त्या पानांच्या । आंतुनि मधुनी सकलांच्या
जरतारी कीं तारपटीं । होति एक विणलेलि स्मृती

जी त्या आनंदासी, त्या । कौमुदीसही मधझरत्या
दाता सात्त्विक जसा धना । देत न कळतां चैतन्या

रूपरेख ना उमटे ती । परी तिची ती गमे स्मृती
चांदण्यांत अंगणांतल्या । आजिस ज्या ज्या आवडल्या

आर्या दावित म्हणुनी मी । बसलों असतां सर्व अम्ही
बाला हंसरी मज चुकवूं । खेळकर सुखें जी दुखवूं

मधेंच माझ्या गाई का । " चांदोबा चांदोबा भागलास का ? "
ताल धरी मज देत धका । " लिंबुणिच्या झाडाखालिं लपलास का ? "

तिची असावी गमे स्मृती । —तिचीच हो हो तिचीच ती !
आल्हादवि ती हंसत तईं । जशी सुखद शशिलेखा ही

कार्यें सम जरि । हेतुहि सम तरि
स्मर्यें अणी । एक मनीं । ही बघुनी—

कोर कोंवळ्या चंद्राची । —ती पोर पोवळ्या ओठांची !

अंदमान, १९१२

## ३७ सायंघंटा

**परिचय**—तुरुंगांत संध्याकाळीं जी घंटा होते ती कैद्यांना विसांवा मिळावा म्हणून कोठड्यांत कोंडण्यासाठीं. थोड्या मुदतीच्या कैद्यांस ती ऐकून अर्थातच शिक्षेंतला एक दिवस कमी झाला असें वाटून आनंददायक होते. पण अधिक मुदतीच्या कैद्यांस ती तापदायक वाटते. अंदमानांत एक दिवशीं या घंटेचे वेळेस जोडीनें बसलेल्या जंगली मले जातीच्या कैद्याबरोबर विनायकरावांचा भावनाकल्लोळ उडविणारा संवाद झाला. तो संवाद व त्यानंतरचे विनायकरावांचे विचार त्यांनीं या कवितेंत गोंवले आहेत.

[ वृत्त : वैनायक

पशुसेची जे सकाळपासुनी सदा
घाण्यासी तैलाच्या फिरति जुंपले
बंदिवान ते सुटतां जूं, जरा कुठें
आतांची येताती बंद अंगणीं.
घाण्याच्या भंवति भंवति सर्व दिनभरी
तुटुं पाहति पाय तरी धावधावतां
घामानें गळल्या जें चिंब जाहलें
भूवर्तुल आतांची सुकत तें जरा.
तोंची बीभत्स तया परिचिता वचीं
दंडकाष्ठ उपसुनि तंडेल[1] गर्जला : १०
' जोडी! हां जोडी!' सहसाचि सर्व ते
बंदी होताति दोन दोन जोडिनें

---

१ कारागृहांतील एक जमादार.

" नीचे !—ना, ऊपर ! मूं बंद ! बे–उठो ! "
स्वविरोधी आज्ञाशत पाळपाळतां
येताती नाकीं नव ! अंतिं एकदां
पंगत ही बसली अपराद्ध जनांची
कामानें, घामानें क्लिन्नगंध ती
सांजेच्या जेवणासि. " रोटि डाल दो ! "
डालरोटि थाळ्यांतुनि सरसहा पडे
' खावो बे ! जलदि ! जलदि ! ' जलदि लागती, २०
खायासी सर्वः तोंचि शब्द ये " उठो ! "
हाय ! तया स्नेहममत्वाविना सुक्या
तुकड्यांचा तोंडीं चघळीतची भुगा,
भुक्त, अर्धभुक्त, रिक्त-जठर वा, जसा
जो असेल तैसा हा सर्व उठतसे
बंदिवान अपशब्दां गुंजतां हळू
असहाय क्षोभाच्या ; सारवुनि करें
उष्टी ती भूमि, अन्न फेंकुनी, मुखा
धुवुनि पुन्हा जोडीनें सर्व परतती.
आणि तया बंद अंगणांत मग पुन्हा ३०
जोडीच्या मागें जोडीस या क्रमें
बंदींच्या ओळी बसवूनि लव जरा

---

१ आज्ञा सुसंगत देण्याइतकी देखील बुद्धि या अडाणी जमादारांना नसे. मूर्ख ऐटीनें फुगून ते एक आज्ञा देत तोंच तीविरुद्ध दुसरी स्वतःच सोडीत. ' बैठो ' हा शब्द त्यांनीं उच्चारला नाहीं तोच " उठो " म्हणत. २ रोटी डाल दो—ह्या सर्व जमादारी आज्ञा होत. स्नानाचे वेळेस देखील ' लवा ' म्हटलें कीं सगळ्यांनीं लवणें. ' भांडें भरा, ' ' अंगावर ओता, ' ' अंग चोळा ' अशा सर्व आज्ञा !

तंडेलादिक होती दंडधर ढिले.
बंदिप येऊनि बंद कोठड्यांतुनी
रात्रीच्या पूर्वीं बंद्यांसि कराया
अर्ध घडीचा आहे अवधि अजुनि कीं
हुश्श करुनि बंदिवान बसतसे जरा
जोडीच्या बंदीसी गुप्त बोलतां
चोरदृष्टि राखुनियां दूरवर भयें !

*　　*　　*

तोंची जो जोडिस त्या दिवशिं माझिया　　४०
तो बंदी सहसाची डंवचुनी हळू
मजसि वदे सोल्हासें ' बघ अहा वरी !
बघ सुंदर चांद ! किती दिवशिं दिसू ये
तो होता एक निकोबारचा कुणी
वन्य जातिमधला ज्या बोलती ' मले '
मद्याच्या चोरीस्तव दंडिला जया
दाट अरण्यचि ज्याचा मूळ पाळणा
पुरही ज्या वाटावें पंजरचि, तया
बंदीच्या कोठडींत कोंडितां असें
तीन मासही व्हावे, तीन जन्मसे　　५०
स्वाभाविकतःचि ते. चंद्र पाहुनी
उल्हसिता वदनीं परि वदन लपवुनी
हळुचि मला बोले एकेक शब्द कीं
गणुनि गणुनि अंगुलिसी " एक हा असा,
एक असा आणिकही,–छे ! न तो तिजा
मास इथें मज पडेल ! बस्स दोनची

हे मावळणारे रे चंद्र या स्थलीं
दुर्दशेंत बघतिल मज, चंद्र तिजा तो
पाहिल ना मजसि अहा कोठडींत या !–
परि त्या विस्तीर्ण तटीं मंजु सिंधुच्या ६०
आमुचिया निकोबारीन सिंधुच्या
जलतरंगदोलावरि दोल खेळतां
पाहिल मज चांद तिजा–डोलडोलत्या
डुंगींतुनि[1] आमुचिया मारितां वल्हें
—आणि करीं हावभाव करित–गीतिच्या
तालावरि जी गाइल मत्प्रिया सवें
वा गातां मजसी कर गुंफुनी तिच्या
लगटुनि लगटूनि कटी मधुनिची जई
वल्हवूं लागेल तीच नौसि हौशिनें
किंवा त्या चांदण्यांत धुवुनि निघाल्या ७०
त्या धवळया सिंधुपुलिन-वालुकांतुनी
विरहत वा धावत वा धरित वा कधीं
अन्योन्या क्रीडनांत: वेंचण्याप्रती
लवतांना किंवा सहसाचि चमकल्या
शंख, शिंप, गारांसी चित्रविचित्रां—
—चांद तिजा मज बघेल ना इथें अहा !"
हंसलों मी " सत्य काय? सुखद हो तरी
मित्रा तुज तव मोचन शीघ्रतर अणी "
निश्चितान्तताहि करी दुःख सुसहसें ;
कां न तरी निश्चित–शीघ्रान्तता करो ८०

---

१ डुंगी–मले लोकांची लांकूड कोरून बनविलेली होडी.

दुःखासहि आतांच्या वर्धकचि सुखीं !
मजसह समवेदनांसि दर्शवूं तयीं
सहजचि तो वळुनि हळू प्रश्नला पुन्हा—
" सांग, गड्या, चांद किती काढणें असे
अजुनि परी दुर्दशेंत दुष्ट ह्या तुला ? "
भावांसी हृदयांतिल दाटल्या क्षणीं
ओतूं मी बाहेरी उत्तरें: " अहा !
कोण करी ह्या गणिता !—चांद दोन वा
तीन, चार, चाळिस–ना ; चांद तो किती—
पक्ष, मास, ऋतु, अयनें, वत्सरें अहा                ९०
तीन, चार, चाळिसः तें गणित हातिंच्या
किति ह्यापरि चरणांच्या अंगुलींसही
धरुनि ना येणारें सत्य मोजतां !
बहुधा मज चांद बघेलचि न कोणता
जेथें तुज चांद तिजा कीं बघेलची !
चांद मला कोणताहि पाहणार ना
लगटुनि लगटूनि कटीं सिंधुतटिं कुण्या
रमतां वा धावत वा धरित वा प्रिये !
निश्चितसें हेंचि मात्र ! उलट जें असे
सर्व अनिश्चित तें तें ! वदसि ' छे ' कसें ?        १००
म्यांचि अनिष्टाची ती जडशिळा स्वयें
बांधुनियां निजकंठीं टाकिली उडी

१ दुःखाचा अंत नक्की अमक्या वेळीं होणार अशा अवधिज्ञानानेंही दुःख हलकें होतें. मग लवकरच ती अवधि संपणार ह्या ज्ञानानें तें दुःख हलकेंच नव्हे तर प्रस्तुत वाटणारें दुःख नंतरचें सुख अधिक सुखद करण्यास कारणीभूत होतें. असे दुःख हें सुखपौष्टिक होतें.

याचि तुझ्या निक्कोबारीन सिंधुच्या
रौद्रशांत जलकल्लोळांत निर्घृणा!
आतां जें बुडणें ती निश्चित स्थितिः
तरणें तो अपघातचि जरि क्वचित् घडे!"

*           *           *

तों घणघण, घणण, घणण नाद घुमुनियां
हुकुमावरि हुकुम सुटेः 'हो खडे! खडे!'
कोठड्यांत बंदीजन कोंडुनी झणीं
बंदीगृह रात्रिभरी बंद सक्तिनें                    ११०
करण्याची घंटा ही! शब्द जरि कधीं
कारेंतहि कवणाचा ऐकुनी मना
वाटे लव हलकेंसें, इच्छिताकडे
पद पडलें एक पुढें गमत जरि असें
साश मना कारेंतहि पळभरी कधीं,
तरि तें कीं सायंकालीन परिचिता
या घंटेच्याची घणघणण निनादें
कीं येतां रात्रींतुनि रथ विचित्र ते
स्वप्नांचे भू-जल-ख-ग[1] शृंखलिताही
देहासी, गेहासी तेंवि, सोडुनी                    १२०
बंदींतं स्वेच्छासंचार घडतसे
प्रियसंगति, भुक्तभोग वा नवीनही!
यास्तव या सायंघंटेसि परिसुनी
हलकासा जीवाचा भार लव गमे.

---

१ पृथ्वी, जल, आकाश असे सर्वत्र संचरणारे, बंदीवानांच्या देहासही सूक्ष्म मायेनें वाटेल तिथें नेऊन विहरविणारे, स्वप्नांचे रथ.

टाकुनिया एक उसासा; वदे हळू
बंदिवान जो तो ‘ दिन हाहि संपला ! ’
मेला दिन-शत्रु एकः नष्ट दशेच्या
सेनेंतिल दिवसांच्या एक शिपाई
पडला होऊनि ठार अधिक एक हा !

*　　　*　　　*

दिवस-मृत्यु-घंटे[१] तूं गर्ज अशीवीः　　　१३०
तर्क करूं ये न आजि मज जरी, तुला
गर्जावें लागणार आणखी असें
कितिदां तें युद्धीं या, हे दिनान्तके !
तरि निश्चित हें निदान गमत कीं असें
संख्या जी दिवसांची कोणती तरी
विधिनियता दास्याची भरतभूमिच्या,
त्यांतिल तूं एक अधिक दिवस दुष्ट हा
मारितेस ठार असाः आणि जें असें
मोचन त्या मातेचें तेंच आमचें
अन्वर्थक मोचन होणार हवेंसें !　　　१४०
देव प्रभुनियत स्वातंत्र्यमूल्य जें
आम्हांप्रति त्या मूल्यांतील एक हा
उग्र तपोदिन-दिनार[२] टाकितांचि हा

१ दिवसाच्या शेवटीं होणारी ही घंटा म्हणजे बंदीच्या शिक्षेच्या दिवसांतील एक दिवस मेला—कमी झाला—सुटका एक दिवस जवळ आली असेच वाटविणारी असे. २ एक पूर्वकालीन नाणें. भारताच्या विमोचनार्थ जें मूल्य देणें, यातनांचे जे दिवस भरणें असेल त्यांपैकीं हा एक यातनांचा दिवसरूपी दिनार आम्हीं भरून दिला.

भरपाई करुनि बंदि-निधिंत या, उठे
यंत्रचलप्रतिध्वनिंच[1] पावतिचा हा
हे सायंघंटे, तव नाद जो असा !
ज्या दिवशीं हिंदभूमि अति कठोर या
बंदिनिधिंत दंडाच्या भरिल अंतिमा
दिवस-दिनारा दारुण दुर्दशेचिया:
बलिदानाची ही नवरात्रि संपतां                    १५०
पूर्णाहुति पडुनि शक्ति-होमहुताशीं
जैं विजयादशमीला प्रज्वलोज्ज्वला
त्या ज्वाला-मालींतुनि तृप्त चंडिच्या
होइल कीं मुकुट दिव्य-दीप्त आमुचा
ग्रहणमुक्तसूर्यासम प्रकट पुनरपि
त्या दिवशीं विजयवृत्त तें करीत कीं
प्रथित दिशा दाही जो आध्रुवध्रुवीं
सिंधु तटोतट प्रति ध्वनित गर्जत्या
जाइल जयघंटेचा घोष महान् या
राष्ट्राच्या पुनरुत्थित ; नाद-सिंधुच्या                    १६०
त्याची हा एक असे नादबिंदु कीं

---

1 कांहीं यांत्रिक पेट्या असतात त्यांत एका भोंकांतून नाणें टाकलें की तितक्या मूल्याचा एक पदार्थ यांत्रिक गतीनेंच दुसऱ्या भोंकांतून बाहेर पडतो. कांहीं पेट्यांत आंत नाणें पडलें कीं यांत्रिक प्रतिध्वनि उठून ती ती पावती मिळते. त्या बंदीगृह-रूपी पटींत यातनांच्या दिवसांच्या नाण्यांपैकीं एक दिनार भरून पडला अशी पावती देणारा असा यांत्रिक प्रतिध्वनिच त्या संध्याकाळच्या घंटेचा तो नाद वाटत असे.

कष्टगणक घंटे, हा नाद जो तुझा
बिंदुबिंदुनें ह्या तो सिंधु सांचणें !
गर्ज तरी तूं स्वाहाकार बलींचे
दास्य-दिनांच्या अस्मत्प्राणहवींच्या !
गर्ज तुझा एक एक दुर्दिनान्तके
घंटे, त्या सुदिनासी आणितो अहा
एक एक दिन सन्निध ! दास्यमुक्तिच्या
सुदिना—ना मम—परंतु हिंदुजातिच्या
मुक्त तिचें जीवन कीं तेंच आमुचें ! १७०
कवण जगे ? अहह जरी हिंदची मरे !
कवण मरे ? हृष्ट जरी हिंद जगे रे !

अंदमान, १९१३

---

१ भारतास मुक्ततेचें मूल्य भरपाई करण्यासाटीं ज्या बलिदानाच्या यातनांचा दंड देणें आहे त्या कष्टांची ही प्रत्यहीं दिवसाचे शेवटीं होणारी बंदीघंटा एक गणक झाली होती. असे यातनांचे पराजयाचे दिवस एक एक मोजून भरले म्हणजे तो विमोचनाचा अंतिम विजय-दिवस दिसणार ! त्या दिवशीं जी प्रचड विजयघंटा सागरासागराच्या तटोतटीं हिंदुस्थानच्या विजयाची ग्वाही फिरवीत गर्जत जाईल त्या तिच्या 'नाद–सिधू' चा ही कष्टगणक घंटा नाद-बिदुच होती. कारण बलिदानाच्या पावतीचे ह्या घंटेचे हे बिंदु बिदु पडत पडतच तो भरपाईचा दिवस उगवून त्या विजयघंटेचा नाद-सिधु भरणार आहे.

## ३८ निद्रे !

**परिचय**—बंदीगृहांत सर्वतोपरी गांजले गेले असतांही विनायक-रावांच्या वांट्यास एक सुख दैवानें जवळजवळ शेवटपर्यंत राखून ठेवलेलें होतें. तें म्हणजे झोपेचें. त्यांस एकदां दिवसाचा त्रास संपून संध्याकाळीं कोठडींत कोंडलें गेलें कीं, झटकन झोंप यावी. ती इतकी सुखद नि गाढ असे कीं, अनेक वेळां सकाळीं घंटा होई तेव्हां डोळे उघडल्यानंतर किती वेळ तरी आपण बंदीगृहांत आहोंत याची जाणीव त्यांना येत नसे. प्रियजनांविषयींच्या स्वप्नांतून किंवा सुखद विसराळू अवस्थेंतून किती तरी वेळानें बंदीगृहांतील परिसरांत जाणिवेनें हळूहळू उतरावें असें होई. सर्व सोबती आणि सांगाती दूर झाल्यावर जी एकच सोबत त्यांस लाधली होती त्या निद्रेचे त्यांस जे मनःपूर्वक उपकार वाटत तेच या कवितेंत त्यांनीं व्यक्त केले आहेत.

[ वृत्त : वैनायक

ये हे निद्रे ये ! तव आगमनाच्या
जइं वार्ता तारांतुनि[1] मम शिरांचिया
येती तइं बाग जशी कुणि सुदूरुनी
ती योजन-गंधा मन मोहवीतसे
गंधेंची भुंग्यांचें, तेंवि भुलवुनी
नेशी मन माझेंही, हे फुलबागे[2]—

---

१ शिरांच्या तारांतुनि–श्लेषानें तारायंत्रांतून–झोंप येऊं लागली म्हणजे जें गोड शैथिल्य आणि सुखद विसावा अंगामध्यें संचरूं लागतो त्या झोंप येत आहे या बातमीच्या आलेल्या 'ताराच' असतात. २ सुखस्वप्नांच्या सोनफुलांनीं डवरलेली बाग–सुखनिद्रा.

स्वप्न-सोनफुलांचिया! कुशल ते जसे
शस्त्रवैद्य शल्य शरीरांतुनी निकें
उद्धरितां यातना न कळुंहि द्यावया
देताती हुंगाया मोहकुपी[1] ती; १०
तेंवि हीन दीनहि दिनसमर संपतां
त्याचे ने विक्षत तो[2] वीर वेंचुनी
रुग्णालयिं रात्रीच्या; आणि देत जी
हुंगाया मोहकुपी तीच तूं! तया
विश्वकुशल वैद्याची: जीर्ण तें नवें,
ताजें जें सुकलें, जें शुष्क पूर्ण तें
या माझ्या गृहिं[3] येउनि करुनि जाशि तूं
कळुंहि न मज तें देतां! हेंचि सात्विका
दानाचें चिन्ह सत्य किति सुदैव हें
माझें की देहा ह्या प्रथम ज्या दिनीं २०
म्यां अपुल्या हस्तेंची रचुनि मम चिता
ठेवियलें तीवरतीं,—चंडिके[4] तया
करुं सुतृप्त!—अग्निकुंडिं तूंहि त्या तईं,
हे निद्रे, सहगमना अंगने-समा
करुनी या यमपुरींत येशि मजसवें!
मम शय्या बंदीगृहिं[5] संगतीं तुझ्या
प्रेममृदुल, मोहक, जणुं शेज फुलांची
देवा, या निद्रेसी तरि निदान तूं
नेउं नको मजपासुनि—सर्व यद्यपी
नेलेंसी! काय नसे मजसि ती इथें? ३०

---

१ क्लोरोफॉर्म किंवा इतर तत्सम मूर्च्छक द्रव्यांची कुपी. २ ईश्वर. ३ शरीरांत.
४ देवी, असुरमर्दिनी, ध्येयमूर्ति तिला. ५ कारागारांत.

पंखांवरि वाहुनि ती विश्व आणिते
कारेंतहि मजसाठीं ! बाग, बगीचे
कारंजीं, कुसुमें, प्रियसंग, रंग ते.
अद्‌भुत, अतिभव्य, भयद, वास्तवांहुनी
अति विचित्र घटना नव नवीन अनुभवी
निद्रे, तव मायेचा स्वप्नपट मनीं
उघडे जइं ! चक्रव्यूहांत मृत्युच्या
मागें पद एकही न परततां पुढें
आणि पुढें मात्र धावल्या अधृष्यशां
काळाच्या रथिं ह्या भरधाव चालल्या                    ४०
अभिमन्युसि[3] तं आयुष्याचिया पुन्हा
नेशी स्वच्छंद मागुती हवें तिथें
कालाच्या रथिं बळेंचि चढसि आणि ते
होती तत्तुरग लगामासि वश तुझ्या
सोनेरी स्वप्नांच्या !—आणि त्या रथीं
वृद्धांही त्या ययातिसमचि अर्पुनी
नवयौवन, नेशी तूं राज्यि रतीच्या ;
पूर्वप्रियकरणींच्या पाजविसी त्या

---

१ वस्तुस्थितींत ज्या घटना अशक्य अशा विचित्र घटनाही जेव्हां स्वप्नांचा चित्रपट उघडतो, तेव्हां झोंपेत सत्यशा अनुभविण्यास सांपडतात. २ न आटोपत्या. ३ आयुष्य हें अभिमन्यूसारखे मृत्यूचे, संसाराचे, चक्रव्यूहांत सारखें पुढें जातें. ' व्यूही शिरेन शरसा मागे परतें न एक पदही न ' ही मयूरपंक्ति येथें सूचित आहे. आयुष्यांत म्हणूनच मागचा क्षण पुन्हा खऱ्या खऱ्या स्वरूपानें अनुभवितां येत नाहीं ; पण निद्रा तो अनुभव देते. काळाचा रथ बलानें मागे नेते, आणि मागच्या घटना अगदी वस्तुस्थितीप्रमाणें, अगदीं आजच्याप्रमाणें आपणाकडून अनुभवविते. सोनेरी स्वप्नें हे निद्रेचे लगाम होत. तीं स्वप्नें काळाच्या घोड्यांस खेंचून मागे नेतात.

प्रथम चुंबनासि पुन्हा !—विरहविव्हला
सत्य समालिंगनसुख !—जे हताश त्या ५०
फल आशातीत लभ्य !—अस्त उदित ते,
विगत होय आगत कीं ! उघडतसे जैं
स्वप्नचित्रपट निद्रे, विजलिचा तुझ्या !
भूत होय वर्तमान—वदति कुणि[1] अणी
विगतचि आगत न अनागतहि होतसे
आगत तव रथीं भविष्याचियाहिः कीं,
चर्मचक्षुसी अद्यापी अनावृता
त्याहि चित्रशामलेंधि तूं प्रवेशिण्या
होशि दर्शिका[2]हि क्वचित् ! योगिजनहि हें
मानिति कीं या अगम्यि, या अतींद्रियीं ६०
एक तूंचि इंद्रिय जें व्यक्त लव करी
अव्यक्ता[3], हे सुपुप्ति, बद्धही जनां !
देह[4] हाचि ना आत्मा, वीजमंत्र हा
धर्माचा अखिल अम्हां काय सुचविसी

---

१ कांहींचा असा अनुभव आहे कीं, पुढें होणाऱ्या घटनाही कधीं कधीं स्वप्नांत प्रथम दिसतात. २ दर्शिका : तिकिट. भविष्याच्या चित्रशाळेंत काय काय चित्रें हळूहळू प्रेक्षकांस उघडीं होत जाणार आहेत तीं निद्रेचें तिकिट काढलें कीं कधीं प्रथमही पहाण्यास सांपडतात. ३ सुपुप्तींत—गाढ झोंपेंत जी स्थिति ती मूळ अव्यक्ताच्या द्वंद्वरहिततेची लवमात्र कल्पना देऊं शकते. ' योगनिद्रा ' हें नांव समाधीला देण्यांत येतें याचेंही कारण हेंच कीं, ती समाधीची कल्पना सामान्य जनांस यावयास गाढ निद्रेंतील जाणीव ही कशीवशी पण एकच उपमा आहे. ४ देह हाच ना आत्मा : स्पेन्सरादिक पुष्कळ भौतिकशास्त्रज्ञही असे मत प्रतिपादितात कीं, झोंपेत आपला देह जिथें असतो त्याहून अन्यत्र आपण संचरतों. ह्या झोंपेंतील अनुभवावरूनच प्रथम देह हा आत्मा नाहीं ही कल्पना सुचली.

प्रथम तूंचि ? ऐंद्रजालिका तया तुझ्या
स्वप्नाच्या आरशांत देहविरहिता
आत्म्यासी आत्म्याला दाविलासि जैं ?
सामान्यासहि गोचर सात्त्विकोपमा
वेदान्ता एकचि ही गवसतसे जी
कैवल्यानंदासी, हे सुषुप्ति, ती— ७०
त्या केवल आनंदाची तुझ्याचिं कीं !
आणि, जरी, हे सुषुप्ति !—मरणही असे
तें तुझेंचि संततत्व[1]—सांगता तुझी
मधुर तरी मरण किती ! सुखद विसावा !

अंदमान, १९१४

---

१ संततत्व म्हणजे अखंड प्रवाहीपणा, आणि सांगता म्हणजे संपूर्णपणा भंगणारी अशी गाढ निद्रेंतील जी आंशिक अजाणीव तीच कधीं न भंगणारी होऊन जींत पूर्णपणें बसते अशी झोंप म्हणजेच मृत्यु असेल तर ' मधुर तरी मरण किती ! '

# ३९ मूर्ति दुजी ती !

**परिचय**—सन १९१० मध्यें विनायकराव फ्रान्समधून परत येतांच इंग्लंडमध्यें धरले गेले. लंडनच्या पोलिसचौकींत प्रथम बंद असतां इंग्लंडच्या मानानेंही अतिशय कडक अशी थंडी पडूं लागली. त्यांतही त्या कोठडीच्या भिंतीहि दगडी ! फरशी दगडी ! त्या काल्यासारख्या गार व्हाव्यात ! जवळ अंथरूण तर काय, पण पुरेंसें पांघरूणहि नाहीं. दिवस-रात्र पाय आपटावे, हात चोळावे, त्या पंधरा वीस पावलांच्या लांबींतच भरभर फेऱ्या घालाव्या, तेव्हां कुठें गारठून जाणारें रक्त कांही उष्णता पावूं शकावें. त्या भयंकर शारीरिक गारठ्याचा परिणाम मानसिक उत्साहही गारठण्यावर होऊं नये म्हणून त्यांनी आपल्या मनास वज्रशाली करण्यासाठीं जी विचारपरंपरा हृदयांत प्रदीप्त केली ती या कवितेंत ग्रथित केली आहे.

[ वृत्त : वैनायक

अपरिचित न जो तुझिया मधुर विलासा :
रम्य सरें तीं, नलिनें, नाल सुभग ते,
ते सुगंध भृंगगुंज, त्या सुमंजुला
सारंग्या, गीतें ती गोड, गोड ती
दयित-स्मृति आलिंगन जीस तृप्तवी,
शेती ती हिरवी, आल्हादिते मळे,
सरितापुलिनोत्थ थंड तीं कलिंगडें,
मुक्त नील आकाशश्री मनोहरा,
मुक्त नील सागरतल, मुक्त वायु ते,
राजमार्गि भक्तीच्या गजर गोड वा १०
टाळमृदंगांचा हरिनाममत्त तो,
चंद्रबिंब शारद मेघांत धावतें,

आशा कीं रिक्त संशयांत सुखभरें :
ऐसें जें नव, संगत, मंजु, मुक्त जें
त्या त्यांतिल मधुर विलासासि जो तुझ्या
मूर्तीच्या लावण्यश्रीस वर्णिता
भाटचि तो लंपट तव : देवि ! तोहि मी
आजि अहह इच्छितसें रूप देखण्या
तें दुजेंचि तव ! तव ती मूर्ति दुजीची !
मूर्ति मधुर ना : परंतु ती भयंकरा २०
तव दुसरी घोर मूर्ति दावि ती मला !
कारण तूं बघसि कां न आजि मज इथें
ऐशा ह्या लोह–पिंजऱ्यांत कोंडिला
हिंस्र कुणी पशु जैसा वध्य तसाची ;
आणि ऐकशी न काय लोक पहा ते
परस्परांसि जे कथिती दावुनी मला :
" असता हा हिंस्र कुणी पशुचि कीं क्वचित्
टिकता या पिंजऱ्यांत–वीर वा कुणी
हा तो परि केवळ कवि भावकोंवळा ;
शोभेची मात्र वस्तु ! शयन-रंगघणीं ३०
विजयायुध वीणाची, म्हणुनि कां कधीं
विजयायुध ती होई समररंगणीं ?
कसली ती कविता सुखभोग–लोलुपा
दाविला ना ह्यास इथें तोंडही पुन्हा
नसता कवि सहत तरि ; हा तगेल ना ! "
कां ? कविता काय कुणी पण्य अंगना
कीं जोंवरि उत्सवीय मनविमोहका

सुवर्णरत्नमौक्तिकांत तनु अलंकृता
तोंवरीच मात्र हात हंसत धरूं ये ?
आणि सुदैवाच्या आकस्मिका अशा 　　　　४०
दुष्काळीं, पुष्करिणी शुष्कसलिल का
तेंवि रिक्तरसगव्हर हृदय तिचेंही
होउनि ती होत हात हिसडुनी दुरी ?
ना, ना, ना! कुसुमसुगंधीय लाघवी
तारेवरि वीणेच्या नाचती मुदें,
तींच तिचीं होउनियां वज्र-कर्कशें
धारेवरि खड्गाच्या नाचतीं पदें!
ना! कविता निजभक्ता त्यागिना कधीं!
भक्त तिला त्यागो, ती त्यागिना तया!
कारण कीं मूर्ति तिच्या असति दोन ज्या 　　　　५०
कर्तव्या अनुसरुनी रक्षिती तिच्या
पूजकासि वा प्रियासि समयिं विभिन्ना.
एक मूर्ति ती : नाचत हृदयमंचकीं
रसिकमनाची वीणा घेउनी करीं
तंतुतंतुंतुनि कुशल-स्पर्श-पुलकिता
प्रेमाची वीज थरारूनि देत जे;
भावनांसि मोहन घालुनि ती करी
लोण्याहुनि कोमलशा—कोमला अशा
कीं जाव्या चांदण्यामधेंहि वितळुनी!
आणि दुजी ती : मूर्ति प्रखर जी तुझी 　　　　६०
कविते घेऊनि शिरे वाण सतीचें
अहह! हास्य करित प्रज्वलित चिताग्नी!

प्रथम मूर्ति तव; यमुना-पुलिन भिजुनि जैं
चांदण्यांत शीतल त्या रात्रिं जाहलें,
त्या रात्रीं कमलनयन श्यामसुंदरा-
सहित रासलीलेमधिं गुप्त गोडशा
हृदयाहृदयासि नाचनाचवी मुदें;
आणी आनंदाच्या किंकिणीप्रती
हास्य-लास्य-मग्न-गोपिका-हृदांतल्या
ताल धरित मंजुल रुणु झुणुं झुणूं झुणूं ! ७०

* * *

परि यमुना-पुलिनीं रसभरित कीं अशा
त्या कवळ्या नंदकिशोराचिया मऊ
लुसलुशीत अधरांवरि मधुर होतसे
मुरली जी, तीच अहा त्याच कोमला
अधरांवरि कर्कश रणशृंग होउनी
रणवेताळाच्या वेताळ-तांडवा
ताल पिटी भारतीय त्या रणामधें
" अच्छेद्योऽयमदाह्योऽशोष्य एव च,
लोकक्षयकृत् प्रवृद्ध काळ, काळ मी ! "
दंष्ट्रा विक्राळ, गर्ज भयद कोण तो ८०
कविते, तव !— जो सहस्र वत्सरांतुनी
घुमत येत आजहि, हें भुवन कंपवी !
—त्या छंदीं, त्या वृत्तीं, समरभीषणा
प्रकटित तव चंडमूर्ति जी दुजी अहा
देवि, आज देवो मज तीच दर्शना !
कारण कीं भिन्नचि हें उदित आजला

कर्तव्य क्रकच-तीक्ष्ण ! आज ना असे
तन्मुद्रा स्मितशुभ्रा, वेष सौम्य ना
जरतारी थाटमाट रंगराग वा
रत्नखचित मुकुटहि तो आज ना दिसे ९०
वाद्यें ना मंगल, ना गीत-मंजु ते
ताफे रंगेल नव तमासगिरांचे !
आज दों दिशा न पथांतुनि आवली
भवनांच्या वर्षती फुलें ; न हर्षती
ललनांचे लोलनयन ; गर्जतीहि ना
लोकसंघ जयजयध्वनी कृतज्ञ ते !
आजि सेवकांसि नसे पारितोषिकें
वांटित ये सोन्याचीं आमुचा धनी—
स्वयंसैनिका त्याच्या आज अवधि[2] वा
मिळते ना क्षणही कीं स्वेच्छ विलासा १००
'अशिथिल परिरंभीं परिमृदितमृणाली[3] –
–दुर्बलशा अंगकां 'सि लगटुनी कुण्या
अविदितगतयाम यामिनीसि न्यावया !
आज उलट सर्व ! उग्र, ना-हिडिस्ससा

१ केव्हां केव्हां शक्य तितक्या सुखाचा उपभोग घेणें हेंच कर्तव्य होऊन बसतें. गणपत्युत्सव, मिरवणुकी, सभा, संमेलनें हीं अशा सुखद कर्तव्याचींच उदाहरणें होत. परंतु 'त्या दिवशीं' दुसरेंच एक कर्तव्य समोर ठाकलें होतें. 'आज उलट सर्व !' हा भाव या छेदकांत वर्णन केला आहे. २ रजा, सैनिकांस मिळते ती : 'आमच्या धन्यानें–म्हणजे ईश्वरानें–नियतीनें–आज आम्हांस कामगिरीची आज्ञा सोडली आहे. विजयानंतर मिळणारी रजा आमच्या वांट्यास आज किंवा क्वचित् कधीही येणारी नाहीं.' हा भावार्थ. ३ भवभूतीच्या उत्तररामचरितांतील 'परिमृदितमृणालीदुर्बलान्यंगकानि । त्वमुरसि मम कृत्वा यत्र निद्रामवाप्ता ।' 'अशिथिलपरिरंभव्यापृतैकक दोष्णोः । अर्विदितगतयामा रात्रिरेव व्यरंसीत् ।' श्लोकांचा संदर्भ सूचित केला आहे.

लोखंडी जबडा वांसूनि आपला
कर्तव्य प्रगट आज! मज चिरावया
दांतांच्या कवळ्यांच्या करवतींत दों!
दगडाहुनि निर्दय हें हृदय तयाचें :
वेपही न बर्बरता झांकि अशी ही
त्याच्या अजि नंगी तरवार तनूची! ११०
आणि बाप रे! थंडी ही भयंकरा!
निर्दयतेहूनि थंड थंड! गोठलें
नदनेदींत पाणी ह्या आणि शरीरीं
रक्तपिंड पिंड अहो जात थिजोनी!
या भयाण एकलकोंडींत एक ह्या
नि:सहाय, निंदित, मी बघतसें स्वयें
जीवनरस नाड्यांतुनि माझिया अहा
थंड पडत जातांना! दगडचुन्यांच्या
या नंग्या अंधाऱ्या भिंतिच्याहुनी
गार गारठा अंगीं असह भरुनि ये. १२०
कारेच्या कोठडींत नागव्या अशा
नंगें कर्तव्य असें मजसि गांठतें!
आणि अधांतरिं शिखरावरति वायुच्या
संभाळुनि तोल सतत चढत धावण्या
आज्ञा मज दे! पाठीवरति लादुनी
पर्वतसम दुर्धर सद्गर्वभार हा

---

१ त्या वेळच्या इग्लंडमधल्या कडाक्याच्या थंडीचें हें भौतिक वर्णन आहे व त्यांत मानसिक प्रतिबिंबाचाही ध्वनि उमटत आहे. २ वायूच्या अत्युच्च शिखरावर अधांतरी चढून जाणें जितकें कठीण, तितकेंच केवळ कल्पनासृष्टींतच निवसणाऱ्या ध्येयास्तव शिर हातांत घेऊन जाणें कठीण.

राष्ट्राचा अखिलाची! ये तरी अहा
तूंहि! तुझ्या त्या दुसऱ्या चंडमूर्तिचें
दर्शन मज दे! कविते, आजि दुजा तो
छेड सूर कर्कश, जो भिववि भैरवा! १३०
सूर ललित ना! रुणुझुणु ताल तोल ना!
आवडते ज्याचे आघात कोंवळे
हृदयकुंजि नाचविती गोड गुलगुल्या
मंजु गीतगोविंदांतील छंद ते:
अबलांच्या अबल हृदा अधिक अबल जे
करिती ते बिल्हणीय करुण छंद वा.
परि, कविते, भेरीचे सूर ते दुजे
छेड आजि, अबलांच्या अबल हृदांही
करिते जे प्रबल प्रलयोर्मि सिंधुसे!
मृत्युंजय मंत्र कुणी प्रकटवील जो १४०
मूर्ति चंडिकेची उद्दंड, द्यावया
चंड मनोबळदाता मजसि वर अजी!
कुरळीं जे खेळावे, केश मृदुल ते,
क्रोधानें राठ राठ उठुनियां जवें,
फुटलेल्या पेंवांतुनि सर्प कीं तसे
बुचड्यांतुनि चवताळत सुटुनि धावती
स्कंधीं वा वक्षीं वा पृष्ठिं वा मुखीं
विकराल क्रोधभरें अति भयंकरा:
एक्या निज हस्तेंची छाटुनी स्वयें
खड्गानें आपलेंच मुंड फल तसें, १५०
अन्या निज हस्तीं घे: आणि अहो जी
रक्ताची धार उडे वरि उफाळुनी

लाल लाल चिकट विकट त्या गळ्यांतुनी
धार तीच घट घट त्या क्रुद्ध मुखें पी
पेल्यांतुनि लाल मद्य पी जसें कुणी!
पिउनि रक्त आपुलेंचि आपली तृषा
शांतवित्या त्या प्रचंड रौद्रभीषणा
रुंडधरा छिन्न-मुंड[1] मूर्तिसी नमो
नमो नमः सहस्त्रधा प्रमत्त-नर्तने!
तूंची कर्तव्य-मूर्ति! तूं जरी अशी    १६०
सद्यःकर्तव्यमूर्ति मद्हृदापुढें
रुंडधरा, छिन्नमुंड, खंड-कृपाणा
ऐशीची मूर्ति धरुनि, तूंहि ये करूं
कविते, या हृदयाचा पाठपुरावा!
जें वेताळीय, काळभैरवीय जें
मारक जें, दुःसह जें, कठिण कटुकटू
तेंचि आज आरोग्यद बलद हो तया!
कीं जैसें तैं होई; अढळ जैं चढे
वीरवर श्रीबंदा[2] वध-शिलेवरी.

*　　*　　*

## श्रीबंदावीर

क्रूर लोह-पंजरांत या निरुंदशा    १७०
तीक्ष्ण सुळे!—लोहाचे दांत रक्तपी
तेंची शिवशिवति अहा देतिना मुळीं

१ शाक्तसंप्रदायांत चंडिकेचें हें "छिन्नमुंडा" नांवाचे एक तात्त्विक रूप प्रसिद्ध आहे. २ श्रीबंदा हा शीख लोकांचा प्रख्यात पुढारी श्रीगुरुगोविंदाचा शिष्य होय. मुसल्मानांस ह्यानें दे माय धरणी ठाय केलें. शेवटीं तो धरला गेला.

अल्प वळायातेंही तनुसि तयाच्या !
पीत रक्त लोह-सुळे टोंचटोंचुनी
देहाची जाळी ज्या जाहली असा
निजरक्तीं न्हालेला कवण हाय हा
पंजरांत बंदिवान ? सिंह कीं जसा !
पंजरस्थ सिंहाच्या श्वान शिकारी
भंवति जसे भीत-धीट रक्तपिपासू
भुंकति बहु टपत तया भक्षुं फाडुनी   १८०
शत्रूचे तेंवि मुक्तखड्ग हे थवे
भुंकत त्या पंजरासि ढकलिती पुढें !

दिल्लीचें दीर्घ पटांगण : सभोंवतें
लोहगजांचें कुंपण रोखतें जना :
ज्या भंवतीं शतसहस्र हिंदु अहिंदू
नरनारी दाट उभ्या दूरवर अहा
प्रेक्षाया हिंदूंच्या वीर रक्षका—
प्रेक्षाया हिंदूंच्या रक्षकासची
ना, परंतु हाय हाय तद्वधासही !
प्रेक्षाया मात्र ! तोंच मुख्य कसाई,   १९०
बादशाह ज्या वदती, तोहि ये ; हळू
फाटक-ना फट केवल करकरूनियां
पंजर लव उघडे : ओढून शृंखला

---

१ पंजाबमधून बंदावीरास धरून दिल्लीस आणिलें तेव्हां लोखंडी पिंजऱ्यांत बंद करून आणिलें. कारण मुसलमानांस त्याच्या विलक्षण तडफेचा आणि यशाचा इतका धाक बसलेला होता कीं, त्याच्यापाशीं अद्भुत सिद्धाई आणि जादू आहे आणि तो मनांत येतांच मांजरादिकांचें इच्छामात्रें रूप धरून निसटून जातो असा मुसलमानांचा समज झालेला होता.

फरफर फरफटित हाय ठेंचठेचुनीं
बंदीवानासि टाकिला पटांगणीं.
खणखण उपसूनि उगारूनि भोंवतीं
शस्त्रास्त्रें शतशः सहसाचि रोखिलीं
एक एक शिष्य तया वीरगुरूचा
शृंखलांत बद्ध पुढें एक एक ये
" होशी का मुसलमान ? वांचसी तरी ! " २००
" हिंदू मी ! शीख आम्हि ! मरण मी वरीं ! "
" हें कुराण—हें कृपाण !—बोल पुनरपी "
पुनरपि ये पुनरपि ये ये पुनः पुन्हा
प्रत्युत्तर घोरनिश्चयोत्थ सत्वरीं
" हिंदू मी ! शीख आम्हि ! मरण मी वरीं ! "
एक एक उत्तर तुच्छवित कुराणा
उठतांची पडत धर्म-वीर-वरांचें
एक एक शीर्ष बळी क्रूर कृपाणा
शंभरदां प्रश्न उठत रानटी स्वरीं :
" होशी का मुसलमान ? वांचसी तरी ! " २१०
शंभरदां उत्तर दे कंप अंबरीं :
" हिंदू मी ! शीख आम्हि ! मरण मी वरीं ! "
एक एक धर्मवीर करित दोनशें
वर्जुनि भय गर्जुनि जय धर्मगुरूचा
वधशिळेसि वाहुनि निजशीर्ष देतसे !
बोथटलें तें कृपाण : जात बुडुनिया
सद्य[1] उष्ण उष्ण शोणितांत वधशिला :

---

1 सद्य—ताजें. बंदावीराचे आधीं त्याचे दोनशें शिष्य त्याचेपुढें मारले गेले आणि तरीही तो गलितधैर्य होईना म्हणून शेवटीं त्याचा एकुलता एक राजपुत्र त्याचे समोर हालहाल करून मारला गेला—तें वर्णन या आणि पुढल्या छेदकांत आहे.

अति अघोर अति उदास दिवसही दिसे
झिंगतसा लाल लाल रक्त पिऊनी.
हाय, अहो ! परि त्या अति किळस आणित्या · २२०
स्थानीं बीभत्स ह्याचि समयिं हें कसें,
कां ये अति कोमल अति करुण लेंकरूं ?
आणि पडुनि त्या बंदी वीरवराच्या
सहसा तें मूल गळां, स्फुंदुनी वदे :
" हाय पिताजी ! हा हा, काय दशा ही
तनुची तव आज राजसाजभूषिता ! "
राजराजभूषणार्ह बंदिवान तो
वीरवर श्रीबंदा अहह आपुल्या
एकुलत्या एक्या तनयासि हुंगुनी
बोले : " हे बाळ ! तुझा मी नसे पिता ! २३०
हिंदुधर्मची, बाळा, पूज्य तव पिता !
माता तव हिंदु-जाति : जा तिच्यावरी
लिंबलोण ओवाळुनि कमल-कोमला
तनुचें तव तनया जा टाक सत्वरीं ! "
सत्वरची साश्रू-सोल्हास तरीही
उठत राजबिंडा तो वीरतनय तैं.
" होशी कां मुसलमान ? वांचसी तरी ! "
" हिंदुधर्म-मंगलार्थ मरण मी वरीं ! "
आणि हाय हाय त्याहि अर्भकाप्रती
नेताती ते नृशंस वध-शिळेकडे : २४०
हळु न्यारे, हळु ! संभाळूनि लेंकरूं
हें लहान इतुकें कीं सांचल्या तया
रक्ताच्या डबक्यांतचि सहज बुडुनिया

जावें कीं जातां त्या वधशिलेकडे !
बोथट[1] तरि तें कृपाण कठिणतम तरी
अति सहजचि कर्म भयंकर करीत तें !
कठिणतमहि बलिदानीं सहजतम तसें
वीरसुत श्रीबंदा वीरवराचा
निज तनुच्या नवनालावरुनि खुडुनिया
वाहुनि दे हिंदु-धर्म-मंगलार्थ कीं                    २५०
समर-चंडिका-चरण-स्थंडिलावरी
निजसुंदर मुखमंडल कमलकुसुमसें !
हरहर ! सत् श्री अकाल ! जय ! पुनः पुन्हा
श्रीबंदा गर्वभरें गर्जना करी !
वीर करी गर्ज; आणि शोक करि पिता[2] :
–किति सुंदर, शूर किती ! बाल एकची
अंतरलें तेंहि अभाग्यासि : घे अशी
श्रीबंदा हाय हाय हाय अंतरीं !
तों ते आलेच कोप-कंपभरानें
थरथरते शब्द, शिव्या, शाप वर्षतां !                    २६०
आणी यन्छब्द उभ्या पंचनदासी
सिंहाचा जेंवि गुहे, तेंवि गर्जवी
यदूगर्जे अक्षरशः मुसलमान तो
ग्रामधाम सांडित घे वन सहस्रशः !

---

१ दोनशेंवर शिष्य हिंदुधर्म त्यागीनात म्हणून मारतांना बोथट झालेलें तें मुसलमानी खड्ग. २ वीराचें कर्तव्य म्हणून बंदावीरास स्वसुताच्या हुतात्मतेनें एकीकडे आनंदही झाला. पण त्याचें पित्याचें अंतःकरण दुसरीकडे नैसर्गिक अपत्यप्रेमानें आंतल्याआंत विव्हळही होत होतें; स्वसुताचें रक्षण करण्यास असमर्थ झालेल्या स्वतःच्या दुःखद स्थितीनें हळहळत होतें.

घोरीपासूनि[1] शल्य अति अघोर जें
दास्याचें हृदयिं सले पंचनदाच्या
तें उपटुनि शतकांचा सूड सहा घे
यत्कृपाण : त्या बंद्या वीरवरातें
तेचि मुसलमान अजि श्वान कीं जसे
शृंखलिता सिंहावरि भुंकती बहू  २७०
तेंवि भुंक भुंकत पुसताति बहुपरी :
" हें कुराण हें कृपाण ! बोल पुनरपी,
कुफरा, हो मुसलमान : वांचसी तरी ! "
धर्मांधा ! यःकश्चित् सैनिकें दिलें
ज्याच्या ना कवडीचें मोल कुराणा,
सेनानी तो स्वयेंचि घालणार का
मूढा, तव भीक भीतिशी अशा खुळ्या ?
" सचमुच क्या ऐसा है ? " मुख्य कसाई,
बोलति ज्या बादशाह, तो वदे मधें
" जावोची तरि सेनानीप्रती तया  २८०
सेनेहुनि अधिक सभादर समर्पिला !
तो कुराण फेंकी ? तूं फेंक कृपाणा
आणी जा तीक्ष्णाग्रा सांडसाप्रती
लोहाच्या लाल तापवूनि आण जा "
लाल लाल सांडस तीक्ष्णाग्र तीरसे
घेउनि ये हत्यारी : अढळ आसनीं
वीर बसे योगयुक्त " बोल पुनरपी,
होशी ना मुसलमान ? " एक एक त्या
प्रश्नातें प्रश्नचिन्ह तेंवि पूर्तवी

---

१ महमद घोरीपासून.

तप्त लोह-सांडस सहसाचि घुसोनी २९०
वीराच्या तनुंत तीर तूणिरीं तसा !
प्रश्नांतीं एक एक तोडुनी अहा
मांसाचा लचका ओढूनि काढिती
लाल तापलेल्या खुपसूनि सांडसा !
अक्षरशः हा अघोर छल रिपू करी !
अक्षरशः तें अघोर धैर्य तो धरी
तो बंदा अखिल-हिंदु-वंद्य हुतात्मा !
"छल अघोर हेंही तें धैर्य चळविना
तरि अघोरतर भोगो खल छलाप्रती :"
बादशाहचि तो ! तन्निश्चित पडे कां ३००
क्रौर्याची ती उणीव? घोरतर छळा
कल्पी लव हत्यारी : तोंचि गर्जला
बादशहा ; "ना तैसें मूढ ! हाणितां
आघाता शत न होय घाव शरीरीं
विषम तसा घाव होय हाणितां मनीं
आघाता एकमात्र ! कुफ्र कारटा[1]
मृतहि चिरा-तोडा तें हृदय !" हृदय तें
त्या हुतात्म वीरतनय तनुसि चिरुनिया
तोडिति ते क्रव्याद क्रूर : आणखी
उष्ण रक्त थबथबुनी गळत ज्यांतुनी ३१०
जिवलगशा राजसशा लाडक्या अशा
एकुलत्या तनयाचें हृदय तें अहो
जनकाच्या त्या वदनीं कोंबिती बळें !

---

१ कारटा—बंदावीराचा तो मारून टाकिलेला मुलगा : त्याचें हृदय काढून बंदावीराचे मुखांत कोंबण्यांत आलें ! कीं त्यानें त्या छळास कंटाळून मुसलमान व्हावें !

हाय हाय–धन्य धन्य–हाय हाय हा!
धन्य धन्य धन्य! तरिहि धैर्य ना चळे!
उस्सहि ना निघत मुखांतूनि : कीं असे
योगिवराचा आत्मा, क्रूर हो, तया
आधींची गत तेथें : कीं 'विचाल्यते
गुरुणापि स दुःखेन न यत्र आगतः!'[1]
सैतानचि! सैतानचि यांत घुसुनिया ३२०
वेडावी आम्हांसी : नर न, भूत हें!
किंकाळुनि भुंकुनि भुंकोनि नीच ते
नंतर आसन्न-मृत्यु वीरवरा त्या
सभ्य मृत्युचेंही सुख मिळुं न द्यावया
उंटावरि उफराटें बांधती बळें
आणी त्या लक्ष लक्ष जनततींतुनी
दिल्लीच्या गल्ली-गल्लींत राक्षसी
मिरवणूक ती माते! लोक पहाते!
लोक पहाते त्यां, त्यांच्याच रक्षणीं
प्राणदान करि त्याचा घोर वध तसा : ३३०
हिंदूंच्या बीजाचे लक्ष लक्ष ते
जन, असुनी दोन हात, लांब मिशाही
बहु मिशाळ पंढाहुनि पंढ होउनी
हिंदूंच्या धर्मरक्षित्यासि पाहती
त्या दशेंत, त्या दुर्बीभत्सनेमधें!
एक जरी मायेचा पूत त्यांमधें—
आईचें दूध जितें एक प्यायला
जरि असेल त्यांत तरी शपथ! धिक् अरे

---

१ यस्मिंस्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते—गीता.

धिक् तुमच्या जीवितास ! लक्ष नर तुम्ही
लटेनें केवळ कीं उसळतां जरी ३४०
तरि सहसा टाकितांचि पार बुडवुनी—
पार ठार तुडवुनि ह्या दैत्य-शतांसी :
—वा निदान त्या निज भीरुत्व-कलंका !
परि आतां तो कलंक हिंदुतेवरी
निज मारक छाया ना पसरविल पुन्हा :
कीं त्यावरि रक्तासी उष्ण उष्ण त्या
हृदयाच्या आपुल्याचि ओतुनी अहा
शुद्ध करुनि हिंदुध्वज रंगवी पुन्हा
हिंदुवीर हा बंदा हिंदु हुतात्मा !
धर्मवीर हा बंदा हिंदु हुतात्मा ! ३५०
देशवीर हा बंदा हिंदु हुतात्मा !
उठति किळसवाणे दुर्गंध ज्यांतुनी
सडलेल्या कुजलेल्या मूत्रमलांचे
नगराच्या त्या उकीरड्यावरी दुरी
नेउनि मग खाटिक ते टाकिती तया
अमरमृता ! “ जा कुफ्‍रा ! रक्तमांस ते
गृध्र तुझें खावोती श्वान सूकरें :
आणि जरी आत्मा कुफ्‍रांहि असेची
खावो तरि आत्म्यानें नरक जा तुझ्या ! ”
तों होई काय ! अहो रुजुनिया तिथें ३६०
तेंचि रक्त मांस तया अमर मृताचे,
त्यांतुनि हंगाम हुतात्म्याचिया तया
सूडाचा उठला उगवूनि अकस्मात् :

मानियले मूषक ज्या, कःपदार्थ ज्यां–
तेचि अहा सिंहासन पोखरूनिया
त्यां धरित्या सिंहांच्या क्रूर भीषणा
तोंडासचि करिताती आपलीं बिळें !
मृत झाला उज्जीवित ! मृतचि मारिते !
गाईनीं मारियलें ठार कसाया
चिमण्यांनीं मारियले ठार ससाणे ! ३७०
पायदळींची रेती तापली अशी
कीं भाजुनि भस्म करी पायदळींसी
आणी ना कुतरेंही भीक दे अशी
होय बादशाहाची बा दशा अहा–
–बंद्याचा सिंहनाद घेतसे जईं
रूपांतर हिंदुडिंडिमामधें महान् !
आणि ईश दे अंतीं यश बळाधिका
मूर्तिभंजकांवरती मूर्तिपूजकां !

* * *

परि होइल हें असेंचि हें न जाणतां
होइलही हें असें न, हेंहि जाणुनी ; ३८०
अति भयाण अति महान उच्च त्या स्थळीं

---

१ बंदावीर मारिल्यानंतर पंजाबांत कांहीं काळ जरी हिंदूंची चळवळ दवली तरी ती पुनरपि चेतली गेली. कारण ज्यांना मुसलमानांनीं ' मूषक ' म्हणून हिणविलें ते महाराष्ट्रीय वीर अटकेपर्यंत चालून गेले. शीखही पुनः बळावले आणि पंजाबांत एक प्रबळ हिंदु राज्य स्थापितें झाले. ह्या इतिहासास उद्देशून हा संदर्भ आहे. २ सिंहासनाला धरणाऱ्या, त्या राजपीठाच्या पायाचे स्थानीं केलेल्या सिंहाच्या आकृती. लक्षणेनें मुसलमानी साम्राज्याचें आधार असलेलें त्यांचें बळ. ३ मुसलमानी सेना. पायांखालीं तुडविलेली हिंदुशक्तीची माती-रेती अशी तापली कीं तिनें तिला तुडविणाऱ्या शत्रूच्या पायदळास–बळास जाळून भस्म करून टाकिलें.

अंधःकारांत, घोर दक्षिणायनीं[1]
चिरवित निज देहा कीं वध्य पशु तसा,
धर्मास्तव नरकीं जो होउनी पचे
तो वीर श्रीबंदा हिंदु हुतात्मा
आज असो ध्येय मला एकमात्रची !
तोची मज नरकं[2] गमो आजि सरससा
स्वर्गाहुनि सप्ताही ! विजय-गीति ना,
–त्याची गा, स्फूर्ते, तूं असह अपजया
ज्या सुरांत बंद्याच्या हृदय-तंतुसी ३९०
लावुनि तूं घोरगीत गाइलेंस तें
व्यक्ति-मरण सौख्याचें असह-त्याच ये
–त्या सुरांत कविते ! तनुतंतुवाद्य हें
माझेंही बांध : राग तो निराश गा :
धैर्याचा परम तशा ! कां न कीं तशा ?
मी न काय एक जरी क्षुद्र डहाळी
तरि त्याची प्रथिता अश्वत्थ-तरूची
हिंदवीय वंशाच्या ? ती यदीयें[3] कीं
शाखा, जरि दिक्कुंजरहस्त दीर्घशी

१ दक्षिणायनीं–प्रतिकूल कालांत. मरणास दक्षिणायन प्रतिकूल असतें. कारण पूर्वी उत्तरध्रुवाकडे असतांना तो रात्रीचा अंधकारमय काल असे. २ नरकासमान ज्या स्थानीं बंद्याचें प्रेत टाकिलें; नरकासमान असह अशा ज्या हिंदूंच्या अवनत परिस्थितींत बंदावीरानें धैर्य न सोडतां पुढिलांच्या यशासाठीं प्रस्तुतच्या अपयशास आपला बळी दिला; ज्या नरकांत त्याचा आत्मा पडेल म्हणून मुसलमानांनीं शाप दिला; हे सर्व अर्थ या ओळींतून सूचित केलेले आहेत. ३ यदीय– ' ज्या हिंदु वंशवृक्षाची बंदावीर एक शाखा आहे त्याचीच मी एक डहाळी आहें ' हा भावार्थ.

हिंदु हुतात्म्या बंधा वीरवराची ? ४००
तेंचि रक्त, अल्पसत्त्व, तरि शिरांत या
तेंचि बीज, जीवन तें, मृत्तिकाहि ती !
तो शकला श्रीबंदा हिंदु हुतात्मा
सहण्यासी जरि असह्य छळ तसे तरी
कां शकेन मीहि न हे छळ सहूं अहा
मीहि हिंदुची असतां ? हे सहेनची–
याहुनिही भयद असे छळ सहेनची
परि झटेन, जीवनांतिंही झटेनची
करण्यासी ही विमुक्त मातृभू पुन्हा !
मुक्त पुन्हा, शक्य पुन्हा, मनुजमंगला ४१०
पुण्यभूमि पुनरुत्थित पतितपावना !

अंदमान

## ४० बेडी[1]

**परिचय**—तुरुंगांत कैद्यांना शिक्षा म्हणून घातलेली बेडी एकाद्या अलंकाराप्रमाणें घासून पुसून चक्क ठेवणें भाग पडतें. या व्यावहारिक विरोधाभासावरून एक तात्त्विक विरोधाभास विनायकरावांना सुचला तो या कवितेंत मांडला आहे.

[ चाल : पाळण्याची

" उजळित उजळित जें । काय करीं
लालिसी तूं दिवसभरी
बंदी, चांदीचे । किंवा ते
अलंकार सोनेरी ? "
अजि नचि ! केवल ती । लोखंडी
बेडी माझी, खंडी
जखडोनी माझ्या । या पायां
स्वेच्छ गती जी चंडी
" फोडुनि तोडुनि जी । जाळावी
तीच कशी उजळावी
आपण आपुलिची । रे बेडी ?
हौस तुझी ही वेडी ! "
सुटते तुटते ही । नचि हो ती
परि जोंवरि तोंवरतीं
गंजे ती तरि कीं । गांजी या
अधिक आपल्या पायां

१ परिशिष्टांत या कवितेवर विस्तृत टीप दिली आहे.

" चरणासि सतत इच्छेच्या । जी वेढी
घडि कवण विधिनिषेधांची । ही बेडी "
जाणे कोण अजी । निश्चित तें
परंतु कीं मज गमतें
इच्छे घडि त्याची । इच्छाची
वा बेडि तदिच्छेची !

अंदमान

## ४१ कोठडी[1]

**परिचय**—तुरुंगांत आल्यावर कैदी आपआपली कोठडी ममत्वानें साफ ठेवूं लागतात. आपली कोठडी साफ करतांना आपले मनांत जे विचार आले ते विनायकरावांनीं या कवितेंत मांडले आहेत.

[ चाल : पाळण्याची

" लिंपुनि शिंपुनि जें । काय तरी
सजविसि तूं दिवसभरी
बंदी, मंदिर तें । एकादा
महाल वा सोनेरी ? "
अजि नचि केवळ या । बंदीच्या
भिंति त्या भुयारांच्या
रक्षिति अवसेसी[2] । माझ्या ज्या
पासुनिया पुनवेच्या[3]
" तरि रे कोठडिच्या । या क्रूरा
भिंति तोडुंची धीरा

१ याही कवितेवर परिशिष्टांत विस्तृत टीप दिली आहे. २ अवस—हा निराशातिमिरांत गुरफटलेला काळ. ३ पुनव—मुक्तजीवनाचा आनंदी दिवस.

झटशिल तरि होई । न क्वचित् कां
        पूर्ण मुक्तता शक्या ?"
पूर्णा ? अजि ना ना । मातीच्या
        भिंति भंवतिं या साऱ्या
तट जो बंदीचा । कीं त्याच्या
        दगडी भिंति दुज्या !
"आशा सोडी ना । या जगतीं
        दगडांच्याही भिंती
धुळिला रे मिळती । तटहि किती
        तडकूनीया तुटती !"
तरिही काय ? अहो । आंशिक ती
        शक्य 'पूर्ण' ना मुक्ति
याहि तटांपुढती । बंदीच्या
        क्षितिजांच्याही भिंती !
"परिसूं परि आम्ही । कुणी कुणी
        त्याही ओलांडोनी
वृत्तींच्या क्षितिजा । वरिलीची
        पूर्ण मुक्तता त्यांनीं !"
रंगांत उषेच्या आणी । सांजेच्या
    चित्रिलें विश्वकर्म्यानें । ज्या साऱ्या
    आकाशछता त्या 'मी'च्या । हलक्यांच्या
हंसूं-असूंच्या या । झोपाळ्या-
        वरतीची झुलत तया
पाहत होतों कीं । होतें जों
        दिसत तोंवरी तरि त्यां !

## ४२ विरहोच्छ्वास

**परिचय**—संकल्पित पानपत महाकाव्याचा विरहोच्छ्वास नांवाचा एक सर्ग विनायकरावांनी लिहिला आहे. त्यांत चाळीस उच्छ्वास आहेत. त्यांतील पांच येथें दिले आहेत.

मुकुल नांवाचा एक वीर युवक हिंदुपदपातशाहीसाठीं लढतांना मुसलमानांचे हातीं सांपडतो. मृत्युदंडाची अपेक्षा करीत तो कोठडींत काळ कंठीत असतांना विरहानें त्यानें जे भावनापूर्ण सुस्कारे टाकले ते यांत गोंवले आहेत.

[ चाल : अजि अक्रुर हा०

हा हाय तुझ्या गोड गातची गाना
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ ध्रु० ॥
सुमकोमलशा प्रेमिं अनंतीं तुजशी
हे प्रीति, धरुनि हृदयाशीं
हा कांहिं असे काळ म्हणुनि या जगतीं
विस्मरुनि हीहि गे वृत्ति
जों दंग अम्ही संगसुखासव पीतां,
अनुभवित पळीं शाश्वतता

हा हाय विरह तों आला !
प्रेमाच्या आनंत्याला
आरोपुनि[1] त्याच्या काला
जरि अंताला । अम्हि तया पला

---

१ प्रेमाच्या अनंतपणाप्रमाणेंच समागमाचा पलही अनंतच आहे असा भास झाला. प्रेम अनंत असलें तरी पलाला अंत असतो ह्या गोष्टीचा विसर पडला!

विसरलों तरी अंत अम्हां विसरेना
छळि विरहवेदना प्राणा !

२

ना लागेना गोड अतां मज कांहीं
मज कुठेंहि करमत नाहीं
ये विजना त्रासूनि जनीं मी आणी
त्रासूनि जनां मी विजनीं
मी केश पुन्हा विंचरीं, पुन्हा विखुरीं
विस्मरत गोष्ट जी स्मरली

फिरफिरुनि तनू लव बसते
बघबघुनि नेत्र लव मिटतें
परि हाय अनुक्षण मन तें
झुरझुरूनिया । झुरतेंचि, तया

पल विरम नसे; करित सखि तुझ्या स्मरणा
छळि विरहवेदना प्राणा !

३

फुलतांचि फुलें सहज खुडीं मी मोदें
हा तोंचि चुरगळूं खेदें ?
कीं खोंवुं फुला केशकलापीं तव ये
तुज बाहुं कुठें अजि सखये ?

तव·पूर्वींचे प्रेमदूत[1] दिसतां ते
हंसतची झुरें मी खेदें
या इष्टजनीं समजवितां ‘ लव खाई ’
लागली भूक ही जाई

स्मरत कीं कसें म्यां रुसुनी
बसतांच तुवां मन धरुनी
तव कवल देत मम वदनीं
मृदु पालविले । मधु कालविले

मधु अधरीं तें करित अमृत जें अन्ना
छळि विरहवेदना प्राणा !

४

हा हाय अतां भेट अम्हांसी कुठली
आशाहि आजि मज विटली !
तरि काकुळती येत विनविलें होतें
आधींच का न म्यां तैं तें
कीं भेटीसी हीच एकली राती
ये क्षणीं नको दवडूं ती

१ पूर्वी हे प्रेमदूत तुझा संदेश आणीत त्या योगें त्यांचें दर्शन होतांच आनंदानें हंसूं येई. ती संवय झाल्यानें आजही ते दिसतांच संवयीचें हंसूं येतें, पण लगेच आतां तुझा निरोप त्यांच्याबरोबर येणें शक्य नाहीं ह्याची आठवण होऊन मन झुरूं लागतें.

मीं समयांच्या[1] सारसारुनी वाती
पाहिली वाट त्या रातीं
पद पथें जरा वाजतांच दचकावें
दूरतां शून्य बैसावें

तों दार अहा किलकिललें
हो तूंचि ! मज झणीं स्वकरें
हृदिं हुंदहुंदुनी धरिलें !
विसरुनि राती । लवचि उरे ती । भोगुं संगतीं

ढकलिली तुला दूर, धरुनि अभिमाना[2]
छळि विरहवेदना प्राणा !

५

विरहाग्नीनें पुष्ट अश्रु हे, आणी
विरहाग्नि पुष्ट अश्रूंनीं
नांदोत असे करित परस्परपूर्ती
हा विरह, आंसवें अणि तीं
मज सुखही दे दुःख, दुःखची तैसें
मज सुखद तपस्याग्नीसें
हो जपी तपी फलद तुम्हां हो तुमची
मज आणि तपस्या माझी

---

१ दिव्यांच्या आणि श्लेषानें वेळांच्या : तिसऱ्या अर्थीं कराराच्या : कराराची ठरलेली वेळ जसजशी जाऊं लागली तसतशी आणखी थोड्या वेळानेंच येण्याचें म्हणाली असेल, येईल, असें म्हणत आणि समईची वात सारीत वाट पहात राहिलों.
२ भेटीस येण्यास तूं रात्र संपत येईतों उशीर केलास तर मी पण बोलत नाहीं असा प्रेमळ रुसव्याचा अभिमान.

ती शिला नको वा मूर्ति
भावने नसूनी दिसती
आलिंग्य, चुंब्य, असती ती
प्रत्यक्ष अशी । तव मूर्ति मशी । समचेतनशी

तींतची दिसो देव माझिया भुवना
छळि विरहवेदना प्राणा !

अंदमान

---

१ शिळेच्या वा धातूच्या मूर्तीची आराधना करीत त्या त्या प्रतीकांशीं मीरा, तुकाराम, चैतन्य यांच्याप्रमाणें मानवी नातीं जोडल्यानें जर ती प्रीति अंतीं भक्ति-पद पावून देवाच्या साक्षात्काराचें साधन होते तर शिळेहून सचेतन, आणि माझ्या प्रेमभावनांशीं समवेदन होऊन प्रत्यक्ष संभाषण-संनिवास-समालिंगन करणाऱ्या ह्या तुझ्या सजीव मूर्तीलाच मी देवाचें प्रतीक समजून तिच्यावर उत्कट प्रेम करूं लागलों तर ती साधनाही अंती देवाच्या साक्षात्काराचें त्या जडमूर्तीहूनही सुलभतर असें साधन कां होऊं नये; हा भावार्थ. भक्तिमार्गात कोण्या मानवी प्रियजनासच मूर्तीसारखें प्रतीक कल्पून त्यावरच निस्सीम प्रीति करण्याचा एक साधनासंप्रदाय आहे. भैरवी, रामकृष्ण प्रभृतींच्या अशा साधना प्रसिद्धच आहेत.

## ४३ रवींद्रनाथांचें अभिनंदन

**परिचय**—१९१३ सालचें श्रेष्ठ वाङ्मयासाठीं दिलें जाणारें नोबेल प्राइझ कविवर्य रवींद्रनाथ ठाकूर यांस मिळालें हें ऐकून विनायक-रावांस अतिशय आनंद झाला व त्या आनंदाच्या भरांत रचलेली पुढील कविता अंदमानांतूनच त्यांनीं रवींद्रनाथांस धाडली.

[ चाल : नृपममता रामावरती०

ज्या समर-बाष्परथैकक्षीं
चिर-विवासिता कमलाक्षी
भारती राजधानीसी । परतते

घनदाट भाट बंदीचा
सुस्वरांत सुस्वर साचा
कोलाहल रणघोषांचा । क्रांतिच्या

मी तरुण धृष्टतेसरशीं
' जावोंचि ' वदें या कक्षीं
ही वीरगीतिही माझी । ऐकिली

" कविकक्ष पूर्ण हा माझा
परि उणीव तेथें जा जा
क्रांतिच्या बाष्पयंत्राचा । कक्ष तो ! "

---

१ भारतमाता आपली राजधानी परत घेण्यासाठीं सैनिकबाष्परथांतून निघाली. २ या कार्यीं कवींची उणीव नाहीं, उणीव आहे ती त्या समररथाच्या यंत्रांत राबणाऱ्या नी स्वतः कोळसे होऊन जळून गति देणाऱ्यांची; तर तिथें जा.

देवीची आज्ञा ऐशी
मलधूम कोळशामाजी
त्या अग्निप्रेरक कक्षीं । मी खेपें[1]

हा आज घुमे जय कैंचा
भारवी कालिदासांच्या
धरि अधृत मान मुकुटाचा । का रवी[2] ?

मलधूम कोळशांतुनिया
सोधणें[3] चर्मि उडवुनिया
मी राजकवे, तव विजया । साजवीं

२

तद्यज्ञागारीं जेथें
ऋत्विग्वर बसले होते
हवनांहिं वीतिहोत्रातें । अर्चितां

अलकांत खोंवुनि एका
करिं अन्य गुलाबी कलिका
ये यज्ञपूजना देखा । भारती[4]

---

१ यासाठीं महाकवीची हौस सोडून हें दुसरें कर्तव्य मीं स्वीकारलें आणि तो महाकवित्वाचा मान ज्यांना मिळाला त्यांतच मीं आनंद मानला. २ रवींद्रनाथ. ३ यावेळीं अंदमानांत विनायकराव कातड्याचें सोधणें गुंडाळून कोळसे भरण्याचें काम करीत होते. स्वाभाविकच हातरुमालाऐवजीं आनंदानें तें सोधणेंच उडवून त्यांनीं रवींद्रनाथांचें अभिनंदन साजरें केलें. ४ भारतमातेनें तिच्या विमोचनास्तव जो यज्ञ चालला होता त्याचे पूजनार्थ एक कळी वाहिली व दुसरी तिनें केसांत खोवली. केसांत खोवलेली कळी खुलूं शकली, तिच्या गौरवांत गुलाबाच्या फुलांच्या जातीचाच गौरव झाला; तसाच रवींद्रनाथांच्या गौरवांत अखिल भारतीय कवींचा राष्ट्रीय गौरव झाला.

निजदास्यमोचना माता
बद्धांजलि मधली हाता-
ती कळी दीप्त दहनीं त्या । अर्पिते

घे प्रफुल्लता निजगंधीं
भ्रमरांची भुलवी मांदी
कळि दुजी गुलाबी परि ती । अलकिंची

भावूनि तद्यशाचा कीं
अलिपुंज-गुंज त्यामाजी
परिणती गुलाबत्वाची । आपुल्या

अलकिंच्या गुलाबा फुलत्या
रे खुलत्या डुलत्या तुज त्या
अभिनंदी दहनांतुनि त्या । ती कळी

३

किति चंदन-तोरण हारी
हें या नव देवद्वारीं
दिव्यार्थ किति कलाकुसरी । सूचवी

कांचनीं खचियलें कोठें
रत्नांत जडविलें कोठें
मधुकुसुममालिका डुलते । नवनवी

या पुण्यदिन-उषःकालीं
पूजेची दाटी झाली
त्या वानिति शत नरनारी । तोरणा

देवळांत जगदंबेचा
हरुं ताप पुजारी तीचा
लघु खंड उगाळी साचा ! चंदनी

झिजझिजत सहाणेवरती
लघु खंड तो तुला देती
घे ख्यात तोरणा प्रणती ! मानुनी

४

श्रीविक्रमसिंहासन तें
चिरलुप्त लुप्त दिव्या ते
वीणाहि मेघदूतातें । गाइ जी

श्रीविक्रमसिंहासन तें
अद्यापिहि लुप्तचि परि ते
वीणा कीं तरि अवतरते ! त्वत्करीं

कीं गान गुंगवी तीचें
गोलार्धें उभयहि साचें
प्रथमचीं कालिदासाचे । नंतरीं

कारागृहिं कांचनगेहा
हे बंदीराज रवींद्रा
शृंखलां राजबंदी ह्या । वंदितों

अंदमान

१ भारतीय महाकवि होऊन तोरण होण्याची मनीषा कवीस होती, पण सहाणेवर झिजत राहून देवतेचा ताप हरण्याचें कार्य त्याच्या वांट्यास आलें. आपली अपूर्ण आकांक्षा कोणातरी भारतीयानें पूर्ण केली, जगतास भारतीय प्रतिभेनें दिपवून सोडलें याविषयीं कवीस कृतार्थता वाटत आहे, हा भावार्थ.

## ४४ हलाहलबिंदु

**परिचय**—गोमांतक काव्यांत भार्गव खेडेगांवांत मठांत एक साधु रहात असे. त्यानें केलेली शंकराची प्रार्थना पुढील पद्यांत आहे.

[ चाल : प्रणती तव चरणा

हलाहला प्यालां । ज्या तुम्ही । हलाहला प्यालां
प्रभुजि, पहा ना बिंदु त्यांतला खालीं हा गळला ॥ ध्रु० ॥

उपाय तूं कोटी । करिसी । उपाय तूं कोटी
सुखदु:खाच्या हलाहलासी शमवायासाठीं

शतसूर्यफुलांचीं सोमफुलें नवनव तीं
अमृतार्द्र आणवुनि पिळुनि मस्तकावरतीं
फेकिशी सदा निर्माल्य तशीं तूं परतीं

चंद्रमौलि भोळा । परंतू । चंद्रमौलि भोळा
अमृतत्वाचा मात्र बिंदु त्या खालीं ना गळला १

देव देवची तूं । ईश्वरा । देवदेवची तूं
ह्या दीनांच्या मनीं न तुमच्या स्पर्धेचा हेतू

अमृतवल्लि राहो । तुमची । अमृतवल्लि राहो
बुटी विवेकाची लव तरि ती अनुपाना द्या हो

जाळी जगताला । कीं पहा । जाळी जगताला
सुखदु:खाच्या हलाहलाचा बिंदू जो गळला २

अंदमान

## ४५ हिंदु नृसिंह

[ चाल : भूपती खरें तें वैभव०

हे हिंदुशक्ति-संभूत-दीप्ततम-तेजा
हे हिंदुतपस्या-पूत ईश्वरी ओजा
हे हिंदुश्री-सौभाग्य-भूतिच्या साजा
हे हिंदु नृसिंहा प्रभो शिवाजीराजा

करि हिंदुराष्ट्र हें तूतें । वंदना
करि अंत:करणज तुज अभि-नंदना
तव चरणिं भक्तिच्या चर्ची । चंदना

गूढाशा पुरवीं त्या न कथूं शकतों ज्या
हे हिंदुनृसिंहा प्रभो शिवाजीराजा !

२

हा भग्न तट असे गडागडाचा आजी
हा मग्न आज जयदुर्ग आंसवांमाजी
ही भवानिची[1] ह्या पुन्हा गंजली धारा
ती म्हणुनि भवानी[2] दे न कुणा आधारा

गड कोट जंजिरे सारे । भंगले
जाहलीं राजधान्यांचीं । जंगलें
परदास्य-पराभविं सारीं । मंगलें

---

१ भवानी तलवार. २ भवानीदेवी.

या जगतिं जगूं ही आज गमतसे लज्जा
हे हिंदु-नृसिंहा प्रभो शिवाजीराजा !

३

जी शुद्धि हृदाची रामदासशिर डुलवी
जी बुद्धि पांच शाहींस शत्रुच्या झुलवी
जी युक्ति कूटनीतींत खलांसी बुडवी
जी शक्ति बलोन्मत्तास पदतलीं तुडवी

ती शुद्धि हेतुची कर्मी। राहुं दे
ती बुद्धि भावड्या जीवां। लाहुं दे
ती शक्ति शोणितामाजीं। वाहुं दे

दे पुन्हा मंत्र तो दिलें समर्थे तुज ज्या
हे हिंदु नृसिंहा प्रभो शिवाजीराजा !

अंदमान

# ५६ आकांक्षा

[ मंदाक्रांता

हेमाद्रीच्या वसत करुनी, गव्हरीं जो घरातें
ज्याच्या कल्पद्रुम-सुमचयें, आंथरी सेज कांते
ऐशा एक्या सकल-विहग-श्रेणि-सम्राट् सुपर्णा
शापी काल प्रणमित न कीं, स्वप्रगामी पदांना १

तो कांतेच्यासह खगपती सप्तवर्षांत शापें
ऐशा, स्वत्वा विसरुनि, पदीं आपुल्या उच्च कांपे
वाटे तारा तुटत जइं तो कोसळे अंतरिक्षीं
ये भूभागीं अचिरचि शिला-लोहसा हाय! पक्षी २

काकांमाजीं गणुनि अपणां काकची जोडपें तें
पक्षींद्राचें, दिवस अधमा-वृत्तिनें नेत होतें
दंपत्याच्या उदरिं तंव त्या, जन्म रे पावली ही
शापांधत्वें पितर गणती काकची ते मलाही ३

माता बांधी परम कुतुकें भूवटीं पाळण्याशी
झोंके घ्यावे मज परि गमे पर्वतस्कंधदेशीं
स्वप्नीं गोष्टी बरळत सुटें वादळांच्या विजांच्या
मी जैं तैं तें अशुभ गणुनी दे हृदा मी तियेच्या ४

देतां प्रेमें करट-घरटा-माजि या तार्क्ष्यबाळे
मृत्पिंडांच्या जनक कवळां, लाल व्हावेत डोळे
लागे दंष्ट्रा नख शिवशिवूं, घोर फूत्कार यावे
कर्णीं कोण्या कळत न रसासी जिभेनें झुरावें ५

नेती येतां सहज मजला जैं उडायास कांहीं
त्या काकांचा कळप निघतां संगतीं ते मलाही
तैं चीत्कारा करुनि सहसा, गृध्र आणी ससाणे
जावे मातें बघुनि, मुखिंचें टाकुनी मांस भेणें ६

गाती जेव्हां करट वधुनी कीटतां पौरुपातें
उच्छिष्टातें पळवुनि हळू ज्ञातिकौशल्य वा तें
वाटे लज्जाविषय मज तें, मी जवें झेप घेतें
सिंधु-पृष्ठीं तिमि उसळतां, भीतिवैपम्य त्यांतें ७

ऐशा एका समयिं निघतां संगतीं काक सारे
जातां जातां चुकुनि शिरलों घोरशा कानना रे
काकांमाजी भयविकट तों एकची हांक झाली
अस्पृश्या ती कवण अहहा आग अंगासि जाळी ८

सों सों फूं फूं करित सुटले दुर्विपाचे फवारे
सारें वातावरण भरिती कालकूटांत वारे
कोण्या आकर्पणिं अजि तरोद्वीपणीं सांपडूनी
हाहाःकारासहचि उडतां खालती कोसळूनी ९

झुंडी जैशा सणण सुटल्या कृष्णपुच्छी शरांच्या
रोधानेंची कुहरिं कवण्या, घोरशा गव्हराच्या
फूत्कारीं त्या दहनवमत्या, वेग तो नावरोनी
पक्षी पर्णांसम टपटपां भस्म होती जळोनी १०

मीही तैशी अवशचि जरी कारणें भिन्न साचीं
झाल्यें फूं फूं घनरव मदोमत्त तो ऐकतांची
पाणी जिव्हे सुटत सहसा, भूक लागे, मुसंडी
नेटे पंखांतुनि, सळसळूं लागले दंत तुंडीं ११

खालोनी त्या भयद कुहरें खेचितां सूं करोनी
औत्सुक्याची नव अवशता; लोटितां ती वरोनी
मी दे वेगें बुडि न उडतां अंतरालांत खालें
आल्यें तों तों श्रवणिं पडली हांक ‘ गे हाय ! बाळे ’ १२

तारी तारी जनकजननी गव्हरीं घोर माझी
आतां जों कीं अवश शिरुनी भस्म होणार तोंची
रोधोनि स्वा गति, हिसडुनी त्यांसि वाहोनि मागां
ये जों अद्रीवरि तधिं दिसे स्वप्न वा सत्य वा गा १३

शृंगीं शृंगीं मलमलमऊ चुंबितां त्या नभाशी
शुभ्रा शांता गिरिं पहुडल्या मेघ-कर्पास-राशी
पिंजारी हा घुसत सहसा त्यांतुनीयां तयांचा
पक्षाघातीं विकिरित नभीं चालला पुंज त्याचा १४

आहे जों त्या भयद कुहरापासुनी उंच कांहीं
पक्षी देहा निज पळभरी तोलुनी स्तब्ध राही
राही राहीनचि तडक तों वांकडा रोख घेई
घेईना तों कुहरिं खिळुनी तीरसा तीव्र जाई १५

प्राणी गर्तानन कुणि ! न तें गव्हर ! क्रूरकर्मा
दे घे, घे दे, लगटुनि खगा, घोर आघात मर्मा
हाटे हा, तों उपसुनि फणा मत्त आव्हान फूं फूं
दे, तो येतां दशन विळखे मारितो त्यास गुंफूं १६

कांहीं त्यांची धरसुट अशी रक्तबंबाळ झाली
दंतां वक्रां क्रकचनखरां, घासतां धार आली
झंजा झंजावरि उसळुनी आपटावा तसे ते
दोघे दोघांप्रति विलगले, झुंज घायाळ हो ते १७

झेंपाझेंपी धरपकड तों चंचुमाजी विखारी
एकाएकीं मुडपुनि फणा सांपडे हो अखेरी
भंगक्रोधें गरल वमला चाविल्या उग्र दाढा
पुच्छाघातें उडवित विजा हाणिली भू तडाडा　　　१८

दारूकामामधिं सुटतसे पेटला बाण जैसा
शत्रूसी तो खिळखिळवितां अंबरीं उंच तैसा
मर्मीं तों दे भयद विळखे चेपितां विद्ध झाला
हा हा ! पक्षी रिपुसह पडे बाण जैसा विझेला　　　१९

चंचूमाजी करकचुनिया कंठ तो रक्त ओकी
ओकी रक्ता विहग वळसे चेपतां वक्ष तो कीं
सोडीना हा खग परि फणा; हा न त्या ते लपेटे
त्र्यांची त्या जटिल पल ही झुंज घे झोंप वाटे　　　२०

त्याचा त्याचा गुदमरुनिया श्वास अंतीं चिकाटी
त्याची त्याची शिथिल किमपी, संधि साधूनि तों ती
पक्षी-राजा सकल बल तें खर्चुनी प्राण-घेते
तोडी फोडी विकल वळसे, रे करूं हृष्ट मातें　　　२१

कीं सूडाच्या गळुनि पडला रज्जुची चाबुकाचा
प्राणी देहा निज मग करी वर्तुलाकार साचा
मध्यें प्राणासहचि वमला त्या प्रभावान् मण्याशीं
वाटे झोंपे रवि सपरिवेष स्वयें हा धरेशी　　　२२

धापा देतां विहग पडला दूर जो भागलेला
मेलेल्याही विभय न धजे स्पर्शुं जेता जिताला
निःशंका ती अचिरचि जयश्री परी माळ घाली
स्पर्धा देती मजसि सखया, सांगतें सत्य झाली　　　२३

ती चंचू, तीं क्रकचनखरें, हैमपक्ष्मप्रभा ती
ऐटीची ती जय-शिथिलता, पांख शोधीत होती
ग्रीवा ती कीं प्रबल लवणें जीस ठावें न मानीं
व्हावें वाटे विहगपतिची त्याच म्यां पट्टराणी २४

दर्पाची कीं सतनु विलसे, उन्नता वक्रताची
शौर्याच्या वा असिदललते शेंग आरक्त साची
कीं काळाचा तिमि पकडतां आंकडा हा गळाचा
चुंबूं चंचू विहगपतिची लोभला जीव माझा २५

" ये गे गेहीं " परि परिसतां आर्तवाणी पित्याची
गेल्यें नीडीं; तळमळत ये नीजही अल्प साची
तों त्या नाना दिवस-घटना-मिश्रणांसी विचित्रां
घेतां घेतां, स्मृति अघटितां रंगवी स्वप्नचित्रां २६

प्राण्याची त्या मृदुल तनुची कीं जशी सेज होई
आणी वक्षीं विहग मज तो दांडगा घट्ट घेई
मर्मी मर्मी अभिनव कला ! उं: ! किती गोड लागे
तों कीं माता मजसि हिसडी, हाय रे ! दूर रागें २७

बोधी क्रोधें अहह ! तनये, सोड नादासि याच्या
याच्यासंगें फसशिल मुली, संकटीं वादळांच्या
पिंडा खाणें पडुनि घरटीं, झोंपणें स्वस्थ साचें
सोडूनी तें स्मरति तुज कां डोहळे हे भिकेचे २८

वारे तोंची सुटति, उठती घोर अंधार, भारें
पर्जन्याच्या नभ लवतसे सिंधु थैमान सारें
प्याली दारू प्रकृति सहसा ! दोल घे वादळांच्या
झोपाळ्यांच्यावरि धरुनिया सांखळ्यांशी विजांच्या २९

तों दों क्रोधोद्धत डुरकते मेघ धिप्पाड आले
अन्योन्यांशीं धडड टकरा देत आम्हांसमोरे
सारी दोघांमधिं पसरुनी पंख मध्यस्थ जैसा
पक्षी शोभे अधर तरता दों नगीं पूल तैसा ३०

बैसूं स्वारी भरुनि वरि कीं दों अम्ही अंबुदांच्या
चंचूंचे अंकुश रुतवुनी मत्त कुंभांत त्यांच्या
गेलों डौलें दवडित तयां कीं महात द्विपाशी
गेलों गेलों मणिमय कुण्या पूर्वदिङ्मंदिराशी ३१

राणी जेथें रति, मदन हा जेथला होय राणा
आलों आम्ही अभिनव अशा रम्य राज्यास कोणा
हैमी हौदांतुनि जिथ उ:पकालच्या टेविलें गा
मार्गी मार्गी सुखमधुमया चेतना दिव्य रंगा ३२

त्या रंगांहीं सुरपधनुच्या पीचकाऱ्या भरोनी
झालों लीलासमर करितां दंग रंगांत आम्ही
आल्या आल्या गगनिं गगनीं, कौमुदीच्या सरी रे
न्हालों प्यालों भरुनि भरुनी त्यांत हे प्राण-प्याले ३३

प्राण्याच्या त्या विपुल तनुची मांसला आंथरोनी
गादी जैसी दुकुल-दुलई त्या घनांची करोनी
भासे माझा जिवलग मला बोलवी ये हृदाशीं
जाऊं गेल्यें–परि न शकलें, हाय! हा! जावयाशी ३४

गेलीं गात्रें खिळुनि सहसा, ये हलूं ना चलूं हो
मातें सारे हिणविति कृमी कीट हांसोनि हो! हो!
लज्जेनं त्या अधिकचि झटें, भेटण्या वैनतेयी
ऐशा कष्टीं तडफडतची रे मला जाग येई ३५

तैशीची मी कळत न कुणा वा मलाही निघालें
स्वप्नीं तैशी तडक विपिना काळच्या थेट आलें
पिंजारूनी गिरिं पहुडल्या पार गेलें घनांना
कोठेंही तो जिवलग परी हाय रे! हा दिसेना ३६

श्रान्ता भ्रान्ता स्मरत दयिता मी भरीं रान शोकें
तों त्या एक्या नभ उतरत्या दिव्यमूर्तीसि देखें
वीणा ज्याची डुलवित घनां घे वहावा! वहावा!
पायीं ज्यांच्यावरि जडविल्या चांदण्या त्या खडावा ३७

मच्छोकें तो गहिंवरुनि मत्सन्निधीं देव आला
त्या शापाचा मजसि कथिता पूर्ववृत्तांत झाला
'बाले, तूं तों गरुडतनया; लोभलीसी जयातें
वांछी तोही प्रणयवश गे, तार्क्ष्य कीं एक तूतें ३८

धूलीमाजी विकल विरहें ढाळि तो आंसवांना
जाती भोंतीं विषधर जिते पाहिलें म्यां सुपर्णा
युष्मत्प्राणांसचि न तुमच्या वृद्ध मातापित्यांही
उद्धाराया प्रणय तुमचा मात्र उःशाप पाहीं ३९

जाणोनी हें द्रवुनि बघतां त्या अणी तीव्र शोकीं
साह्या गेलों परि न मम गे, साह्य याचीच तो कीं
हा तो सारा कलह करवी! भांडखोरां जनांनीं
पूर्वी कंडी पिकविलि गमे, तीं जणूं सत्य मानी ४०

मातेंची का, कलह बघतां हौस कोणा न वाटे?
तीचेंही मी परि अलिकडे काढिं का नांवही तें?
लोकार्थी म्यां सतत झटतां नारदानें पुराणें
गाती थोडें, चुकुनि कळही लागतां लांब गाणें' ४१

बोलूनीया हृदय-भरतें, दावुं आभार अज्ञा
एकाएकीं सुरमुनिपुढें मी पडें नष्ट-संज्ञा
आश्वासोनी त्वरित उठवी देव, तैं पत्रिका ही
प्रभ्वाज्ञेनें प्रभुकुरिं करीं धाडण्या धाष्ट्र्य पाहीं ४२

फाटूं व्हावें करट-घरटें एक कीं म्यां खुजावें
कां ही वृत्ती विषम करि तें शापवृत्तांत ठावें
ईतें पूर्वी व्यसनसम जें अंधकारांत जिंकी
दिव्यालोकीं तुजसि अजि तें प्रेम अर्पी प्रिया कीं ४३

मंथायाचीं विषधर-विषें हांव ती रत्नकामी
माध्यान्हींच्या दिनमणिवरी धाव ती दिव्य-गामी
झंझा-झोंके मज अनुभवूं हेंचि उल्हास वाटे
काकस्वास्थ्यीं करटघरिंच्या जीवणें मृत्यु दे तें ४४

पक्षांमाजी प्रबळ तुझिया गाढ आलिंगनीं ते
मर्मी मर्मी शिवशिवतसे चेपिलें जावयातें
तार्क्ष्येच्या या करटगतिची लाज तार्क्ष्या ! तुला ही
येई ! येई ! जिवलग खगा, नातरी प्राण जाई ! ४५

[ आर्या

रतिनें, दाक्षिण्यानें, अनुकंपेनें परी तुवां यावें
राणी म्हणुनी किंवा दासी गणुनी परी हिला न्यावें ४६

‘ हों, त तुझ्या जीवन हें, ‘ नां ’ त तुझ्या मरण वा जिचें आतां
मूर्तिमतीच महत्त्वाकांक्षा मी ध्येय तेंच तूं महता ! ४७

## ४७ जगन्नाथाचा रथोत्सव

**परिचय**—जगन्नाथपुरी या क्षेत्रीं जगन्नाथाच्या रथाची मिरवणूक प्रतिवर्षी निघत असते. ती मिरवणूक एक उदात्त व विशाल प्रतीक आहे, अशी कल्पना सुचून तिचें वर्णन या कवितेंत केलें आहे. यांत विश्वनियंता जगन्नाथ गतींचे अश्व जुंपलेल्या दिक्क्षितिजांच्या रथांत बसून कालाच्या अतुट उतरणीवरून कुठें जात आहे याबद्दल साश्चर्य प्रश्न केला आहे.

[ चाल : हंसतमुख तरुण० सारखी

ऐश्वर्यें भारी । या अशा । ऐश्वर्यें भारी
महाराज, आपुली कथा ना कुठे निघे स्वारी ॥ ध्रु० ॥

दिक्क्षितिजांचा दैदीप्य रथ तुझा सुटतां
ह्या कालपथाच्या अतुट उतरणीवरता
नक्षत्रकणांचा उठे धुराळा परता

युंगक्रोश दूरी । मागुती । युगक्रोश दूरी
महाराज, आपुली कथा ना कुठे निघे स्वारी ?

२

पुसूं नयेचि परी । पुसतसें । पुसूं नयेचि परी
मिरवणूक ही किमर्थ अथवा कुठे निघे सारी

---

१ ही जगन्नाथाची मिरवणूक ज्या कालाच्या उतरणीवरून येत आहे त्या कालपथाचे युगें हेच कोस होत ! तो सृष्टिविकासाचा रथ धडधड पुढें जातो तसा मार्गावर चुरडून उधळून गेलेल्या नक्षत्रमालिकांचा धुराळा मागे उठत आहे.

दुज्या कुण्या द्वारीं । जावया । दुज्या कुण्या द्वारीं
किंवा केवळ मिरवित येऊं परत निजागारीं

ह्या सूर्यशतांच्या किती मशाली जळती
मधुनीच शतावधि चंद्रजोति[1] ह्या उडती
सरसरत बाण हे धूमकेतुचे सुटती

कितिदां आणि तरी । हीहि तैं । कितिदां आणि तरी
उठे चमकुनी रात्रि[2] पुरातन तिच्या अंधकारीं

३

जीवाचीच किती । कथा या । जीवाचीच किती
रथासी जगन्नाथ, तुझ्या या ओढूं जे झटती
ज्वालामुखिपंक्ती– । पासुनी । ज्वालामुखिपंक्ती
—मज्जापिंडापर्यंत प्रस्फुटिता जी जगतीं

---

१ दारूकामांतील; श्लेषानें निरनिराळ्या सूर्यमालांतील चंद्र–आज प्रकाशणारे आणि कालेंकरून मागमूस देखील उरूं नये असे चंद्रजोतीसारखे विझून जाणारे जे चंद्र–त्यांच्या ज्योति. २ मूलरात्रिर्महारात्रिः 'आसीदिदं तमोमूढं प्रसुप्तमिव सर्वशः' किंवा भौतिकशास्त्रदृष्टया जडद्रव्य विकास घेतां घेतां त्यांतच चेतना, जाणीव स्फुरूं लागते. 'उठे चमकुनी' पुनः तो संघात पृथक् होतांच जाणीव, ज्योत नष्ट होऊन जड मागे उरतें.

उंचनिंच पाठीं । पुढति वा । उंचनिंच पाठीं
गति[1] तितुकी तव रथा झटतसे ओढायासाठीं

इच्छांत आणि या भूतमात्र वेगांच्या
ओंवून लगामा तुझ्या परम-इच्छेच्या[2]
त्या अतुट उतरणीवरती हो काळाच्या

खेळत हा अतलीं[3] । रथोत्सव । खेळत हा अतलीं
महाराज, आपुली कथा ना कुठें निघे स्वारी ?

अंदमान

---

१ जगन्नाथाचा रथ ओढण्यास प्रत्यक्ष ‘ गती ’ च घोडा झाली आहे. मज्जापिंडांतील रसामध्यें जें स्पंदन होऊन भावभावना प्रकट होतात त्या स्पंदनापासून तों जडांतील भौतिक गतीपर्यंत सर्व स्फोट–विकास–‘ प्रगति ’ ह्या जगन्नाथाच्या महान् मिरवणुकीस पुढें नेत आहेत. २ जसा घोड्याच्या वरवर स्वैच्छ दिसणाऱ्या वेगांत धन्याच्या इच्छेप्रमाणें हलणारा लगाम गोंवलेला असतो, तसा ह्या सर्व भूतमात्रांच्या, वस्तुजाताच्या वेगांत ईश्वरेच्छेचा, परमप्रवृत्तीचा रश्मि ओंवलेला आहे. ३ ज्याला तल नाहीं, धर नाहीं; अशा पथानें. निर्हेतुक–निरावलंबी–इत्यादि तात्त्विक संदर्भही त्या शब्दानें ध्वनित होतात.

## ४८ सूत्रधारास

[ चाल : तूं माझा यजमान० सारखी

सूत्रधार आपुला । जरा तरि पडदा हा उचला ॥ ध्रु० ॥
" या दृश्याच्या पडद्यामागें कथिति कुणी मजला
रंगभूहुनी रंगकक्षची आश्चर्यी खचला "
" त्रिरंगवाटी एक तिथें ती, तीमधुनी सकलां
दृश्यांसह नटवर्ग निपजतां आम्हीं पाहियला "
" इतुकें नचि परि विचित्र वाटीमधूनि त्या सजला
सूत्रधारचि स्वयें उपजतां आम्हीं पाहियला "
" कसली वाटी कसले घेउनि रंगबिंग बसलां
स्वश्वसितीं तो सूत्रधारची रची इंद्रजाला "
" प्रत्यक्षासी प्रमाण दुसरें हवें कासयाला
पडद्यामागें आम्हीं अंधःकारा पाहियला "
" स्वयेंचि होतां अंधकारमय आंत पाहत्याला
आंत जाउनी पडद्याच्या कीं आम्हीं पाहियला "
" असंख्य ! एकामागें दुसरा, दुसऱ्याच्या तिसरा
पडद्यामागें पडदा केवळ आम्हीं पाहियला "
" पाहियलें ! प्रत्यक्षचि कथितों पाहियलें त्याला ! "
वदती सारे ! आप्तचि सारे मानूं कवणाला ?
उचला उचला ! वा न ! धन्यची मम आत्मा धाला
तुझ्या जयें या रंगभूमिचा रंग पाहियेला !

अंदमान

---

१ रंगपट.

## ४९ अज्ञेयाचें रुद्धद्वार

[ चाल : भूपती खरें तें

ज्या घरापासुनी मार्ग सर्व फुटणारे
येणार घरासी मार्ग त्याचि ते सारे

ऐकोनि तुझ्या भाटांच्या
गप्पांसि गोड त्या त्यांच्या,
घ्यायासि विसांवा माझ्या
जीवासि ये घरीं तुमच्या
ठोठावित थकलों ! अजुनि नुघडती बा रे
आंतूनि तुझीं तीं बंद सदोदित दारें १

विस्तीर्ण अनंता भूमी
कवणाहि कुणाच्या धामीं
ठोठावित बसण्याहूनी
घेईन विसावा लव मी
येईन पुन्हा ना तुझ्या घरा ज्याचीं रे
हीं वज्रकठिणशीं बंद सदोदित दारें २

ज्या गाति कथा राजांच्या
सोनेरि राजवाड्यांच्या
मी पथें पुराणज्ञांच्या
जातया घरा त्या त्यांच्या
चाललों युगांच्या कोशशिला गणितां रे
तों पथा-अंतिं घर एक तुझें तें सारें ३

दुंदुभी नगारे शृंगें
गर्जती ध्वनींचे दंगे
क्रांतिचे वीर रणरंगें
बेभान नाचती नंगे
मी जात मिसळुनी त्यांत त्या पथें जों रे
अंतासि उभें घर तेंचि तुझें सामोरें ४

कोठूनि आणखी कोठें
चिंता न किमपि करितां ते
ही मिरवणूक जी मातें
नटनटुनि थटुनि या वाटे
ये रिघू तींत तों नाचनाचतां मारे
पथ शिरे स्मशानीं! ज्यांत तुझें तें घर रे ५

सोडुनी गलबला सारा
एकान्तपथा मग धरिला
देतात तारका ज्याला
ओसाडशा उजेडाला
चढउतार घेतां उंचनिंच वळणारे
अजि मार्ग तोहि ये त्याचि घरासी परि रे ६

जरि राजमार्ग जे मोठे
तुझियाचि घराचे ते ते
घर अन्य असेलचि कोठें
या अरुंद आळींतुनि तें
मी म्हणुनि अणूंच्या बोगबोगद्यांतुनि रे
हिंडुनी बघें घर अंतिं तुझें सामोरें ७

घर दुजें बांधुं देईना
आपुलें कुणा उघडीना !
या यत्न असा चालेना
वसते न सोडुनी यत्ना
ठोठावित अजि मी म्हणुनि पुनरपी बा रे
तीं तुझ्या घराचीं बंद सदोदित दारें ! ८

अंदमान

## ५० मरणोन्मुख शय्येवर

**परिचय**—१९११ ते १९२१ पर्यन्त अन्दमानमध्यें तुरुंगांत विनायकरावांची प्रकृति एकसारखी बिघडत जाऊन क्षयावर जाते कीं काय अशी डॉक्टरांनादेखील भीति पडली असतांना व केवळ थोड्याशा दुधावर राहून अंथरुणास महिनोगणती खिळून पडलेले असतांना त्याना मरण बरें असे वाटू लागे; इतकेंच नव्हे तर तें एकदां अगदीं अंथरुणाशीं येऊन ठेपलेंही! त्यावेळेस मृत्यूच्या त्या गंभीर छायेखालीं ही कविता त्यांनी लिहिली.

[ वृत्त : वैनायक

ये मृत्यो! ये तूं ये, यावयाप्रती
निघालाचि असशिल जरि ये तरी सुखें !
कोमेजुनि जावया भिवोत हीं फुलें
हीं द्राक्षें रसरशीत सुकुनि जावया
भ्यावें तें कां म्हणुनी तुजसि परी मी ?
माझ्या पेल्यांत किती पीत राहिलों
तरि न संपतीच अशा असति आजि या
अश्रूंच्या मदिराची मात्र राहिल्या !

ये, त्या जरि नैवेद्या अससि भुकेला
आणि जरी दिवस असे अजुनि तरुण हा १०

तरि लहानथोर अशीं असति संपलीं
दिवसाचीं कार्येंही बहुतकरुनिया;
तोडजोड करुनि परी फेडलीं ऋणें
जन्मार्जित जीं जीं तीं; ऋपिऋणाप्रती
श्रुतिजननीचरणतीर्थ सेवुनी कधीं,
धरुनि कधीं ध्रुवपदांसि संत-ततीच्या
आणी ही आचरुनी एक तप अशी
आशेच्या या स्मशानभूंत तपस्या
देवऋणा, फुंकुनि रणशृंग, दुंदुभी
धडड धडड पिटुनि, आणि तो अघाडिचा २०

चढवुनि तैं हल्ला सहसाचि ज्या पळीं
सुटली रघुवीराची प्रथम रणाज्ञा
आणि त्याचि रणयज्ञाग्नींत पेटल्या
अस्थि अस्थि, मांस मांस, इन्धनें तशीं
जळत जळत आज असे शेप राहिली
राख यौवनाची मम! आणि म्हणुनिची
फेडाया पितृ-ऋणासि आजि अहो मीं
शास्त्रातें अनुसरोनि, दत्तविधानें,
निपुत्रिकत्व वारियलें : पुत्र अखिल हें
अभिनव भारतची मम! जेथ जेथ कीं ३०

पाळण्यांत विकसतसे नयन-कमल तें
तेथ तेथ मीच बघें सृष्टि-कुतुहला.
नव उन्नति शील भालपटलिं दिसत जैं

उदयोन्मुख तेज तरुण, तैं पुनः पुन्हा
माझ्याही उदयोन्मुख होति हृदीं या
आशा नव, आकांक्षा उच्च, भावि त्या
आमुचिया वंशाच्या गौरवाचिया—
भारतीय केवल ना, मानवीयही
वंशाच्या गौरवार्थ ! अखिल मानवी
यौवनांत अनुभवीन यौवनास मी ४०

आणि पितर माझे ते प्रेमतर्पणा
येइं सुखें मृत्यो, तरि—असति हीं अशीं,
तोडजोड करुनि परी फेडिलीं ऋणें.
आणि बहुतकरुनीया असति संपलीं
दिवसांचीं कार्येंही : यद्यपी कधीं
उगवे हा दिवस, कधीं मावळेहि वा ;
कर्में वा कवण, कशीं कार्य, या दिनीं
याविषयीं पंचांगें भिन्न, भिन्नची
भट्ट आणि पण्डित हे कथिति मज कथा,
तरिहि लोकसंग्रहार्थ, धारणाप्रती ५०

माववीय आत्यंतिक आत्माहिताच्या,
सज्जनासि गमलीं अनुकूल तींच कीं
कार्यें म्यां धर्म्य अशीं मानिलीं, अणी
तदनुरूप एकाचा म्हणुनि जो ठरे
म्यां माझा भार असे उचलिला मुदें

---

१ अर्थात् हें जीवन. हा जन्म हाच याचा आरंभ आहे कीं केवळ रूपांतर ; मरण हाच अंत आहे कीं केवळ तिरोधान हें कोणीं सांगावें ? २ अर्थात् स्मृतिप्रभृति ग्रंथ. स्मृतिकार, तत्त्वज्ञानी—नैको ऋषिर्यस्य वचः प्रमाणम् ।

यथाशक्ति यथापरिस्थिति न भंगितां
धरिलें तें व्रत कदापि किमपि ना भयें.
सत्कुल, अव्यंग देह, परम दयाळू
जनक आणि जननी ती, त्यांहुनीहि कीं
वात्सल्यें, पुण्यें, प्रतिपाळिता तसा 60
अग्रज, जो अग्रगण्य तापसांमधें ;
मूर्त विनय अनुज असा ; अद्वितीयसें
प्रेयांचें प्रेमपुण्य ; धन्य आणि तें
ध्येय महत्, देई जें जीवनाप्रती
सार्थकत्व मनुजांच्या, काव्यमय करी
जें आयुःकालातें, पूत चरित्रा ;
तप कांहीं, जप कांहीं, यश कांहीं तें,
कांहींशी मान्यताहि शारदेचिया
राजसभेमाजी कविरत्नभूपिता 70
चाखियले रस नाना ; हुंगियले ते
शतभूजलवायुललित शतसुगंध कीं
पंचाग्नीमधिल तया प्रखर भाजत्या
उत्तापापासुनि तों प्रीतिच्या मऊ
स्निग्ध परिष्वंगापर्यन्त सर्वही
शीतल, शीतोष्ण, उष्ण अनुभवीयले
कटिबंधस्पर्श तसे ; परिसिले किती
स्वरशत, शतभाषा, शतगीति नवनवा
शतमंजुल कंठांतिल—आणि मृत्यूच्या

---

1 ह्या शब्दाचा श्लेषार्थ हा त्या सर्व रूपकाचे मानसिक आणि भौतिक असे दोन अर्थ करीत आहे.

शतकठोर कंठांतिल घोर लागल्या ;
नाना जन, जानपदें, जातिविभिन्ना ८०
देश किती दृश्यें तीं, भूमिच्या महा—
संग्रहालयांत परिभ्रमत पाहिलीं.
सुरूप तें, सुरेख तें, सुललित तें असें
पाहियलें डोळ्यांनीं किमपि तरि जया
मृत्यो ! ते डोळे हे झांक तूं सुखें !
—झांकणेंचि आवश्यक जरि गमे तरी !
कीं सुरेख पाहियलें–किमपि परी तें !
प्रीति विपल : विरह चिरंतन ! नवीं वयीं,
प्रौढ धुरंधरहि न जी शकति तोलण्या,
तीच धुरा भर उन्हांत तोलणें घडे ! ९०
म्हणुनि असे अजुनी अपुरीच राहिली
खेळाची हौस हंसत चांदण्यामधें
या आयुष्याच्या मम ! तरिहि जाणुनी
कीं न ययातीचीहि हौस पुरेशी
झाली जरि आयुष्याचाचि सर्व तो
नृपति करी खेळ एक ; आणि पाहुनी
इच्छेच्या बीजा फल भोग लागतां
इच्छेचीं बीजेंची त्यांत फिरोनी ;
आणी अनुभवुनी कीं एक भुकेची
एक जेवणानें जी तृप्ति जाहली १००
तृप्ति सहस्राव्याही भोजनामुळें
असते कीं तितुकीची आणि तशीची ;
मी दे तुज अनुमोदन संपवूं असा
हा जीवनलेख इथें ; पृष्ठि या जरी

पृष्ठें जीं पुढलीं तीं मागल्या तया
पृष्ठांची असली पुनरुक्तिची तरी !
म्यां असतां दिवस नसे व्यर्थ गमविला
दिवसास्ताचेंहि म्हणुनि दुःख ना मला.
—भीति उद्यांची ही वा ! मृत्युच्या मृता
जरि असेल त्या अंधःकार-लतेला १ १०
फुलत दुज्या[1] दिवसाचें फूल तरीही
भीति न मज ; कीं येथें पेरिलें अम्हीं
फुलत आणि फलत तेंच, कथिति ते तिथें.
आणी मी पेराया कष्टलों असें
बीजें कीं तीं तीं जीं निवडुनी दिलीं
त्यांनींची अत्युत्तम म्हणुनिया मला
पेरुं फलाशाविरहित. "तूं तसें जरी
वर्ततील समपरिस्थितींत अन्यही ;
तरि लोकोन्नति-विनाश होय ना असें
वर्त" तसेंची वर्तुं यत्न म्यां सदा १२०
केला आबाल्य. 'जसें अन्य तुझ्याशीं
वागावें म्हणुनि तुला वाटतें तसें
तंहि वाग अन्याशीं' संतवचन हें
मी अनुपलिं पालाया कष्टलों अणी
जरि आपद्धर्म सेव्य मानिले तरी
ते इतुक्यास्तवची कीं धर्मची[2] स्वयें

१ दुज्या दिवसाचें फूल—पुनर्जन्म. दुसरा जन्म असेल तर तो कर्मफलाप्रमाणें असतो ही उपपत्तीही सत्य असली पाहिजे. पुनर्जन्मवादी तसेच म्हणतात.
२ धर्मच स्वतःच्या रक्षणासाठीं कधीं कधी आपद्धर्माचें हत्यार उपसतो.

ओपुनि दे आपत्तीच्याचि मज करीं !
जै हिरव्या गवताच्या गार गालिचा—
वरुनि दहापावलीच अंगणामध्यें
कारागारांत कधीं मी फिरे तधीं  १३०
आत्मौपम्यांत मुरत चित्त थिजोनी
कितिदां तरि चरण अकस्मात चालतां
स्तंभित होऊनि रहातेत घटिघटी
कांहीं केल्याहि तया तरुण कोंवळ्या
गवताचे अंकुर दुखतील या भयें
पाय त्यांवरी नये पडूंचि कीं पुढें
हातींचा घास कधीं हटुनि रहावा
हातींचीं, कीं जितुकीं त्यांत शितें तीं
बीजेंची नव्हत काय ? खातसों अम्ही
फळ तें तें भ्रूणघात ? आणि कधिंकधीं  १४०
मज पडलें भय कीं मज वेड लागलें !
आत्मौपम्यास जईं वर्तण्यांत हें
मन माझें अनुसरितां मज पदोपदीं
मरणासम दुःख होय पाहुनी जगीं
पूर्ण असंभवचि तथा आचरूं पुरें
तरिहि यत्न म्यां केला; अज्ञतेमुळें
वा अशक्यतेमुळेंच पद कधीं जरी
स्खलित जाहलें असेल तरि असेल तें

---

१ जें जें खाऊं जावें त्याची त्याची हत्या होते असे वाटून घांस गिळूंच नये. फळ हें भावी वृक्षाचा गर्भच होय. जो जो नारळ आपण खातों तो तो एक भ्रूणघातच होतो, असा विचार जों जों सूक्ष्म होई तों तों जगणें अशक्य नि अनीति वाटे, वेडावून गेल्यासारखें होई.

म्हणुनि भय उद्यांहि ना. स्मशानभूमिचा
परतटप्रदेश जो अनोळखी तिथें                                    १५०
सुखकर प्रवास करवि जें असें असे
ओळखिचें पत्र अम्हांजवळ त्या स्वयें
भगवान् श्रीकृष्णाचें–श्रीमतां गृहे
शुचीनां च ! वा गेहे योगीनामपि
'कश्चित् कल्याणकृच्च तात दुर्गतिम्
नहि गच्छति ' नहि गच्छति सांगती अणी
ते निरीश्वर-स्वभाव-वादिही मला ;[1]

म्हणुनि जरी सत्यचि जें वदति ते, जरी
स्वर्ग, नरक, जन्मान्तर, बंध, मुक्ति वा
निजकर्माचाची परिपाक कीं तरी                                    १६०
मरणाची वेस जयामाजि उघडते
त्या अदृष्ट नगरांतिल अति सुरम्य ते
राखवूनि ठेवियले असति बंगले
आधींची आम्हांस्तव भरुनिया अम्ही
कर्माच्या, धर्माच्या नियत विसारा !
परि जरि कीं स्वर्ग, जीव, बंध, कर्म वा
ऐहिक तें इन्द्रजाल मात्र, कीं जरी
संघातोत्पन्न भाव मात्र जीव हा
मृत्युपृथक्करणिं अभावांत[2] ओसरे
तरि सर्वोत्तमचि ! मरण एक सुषुप्ति                                    १७०

---

१ निरीश्वरवादी, स्वभाववादी–बुद्धासारखे, सांख्यांसारखे. कर्मफलाचा व पुनर्जन्माचा सिद्धांत त्यांचा आणि सेश्वरवादी श्रीकृष्णादिकांचा एकच आहे.
२ अभावांत : चार्वाक किंवा आधुनिक Positivist Compt, Spencer, Mill, Haeckel, प्रभृति प्रत्यक्षवादी तत्त्ववेत्ते म्हणतात तेंच खरें धरिलें तरीही चिंता नाहीं.

अथवा प्रत्यक्ष मुक्ति ! पंचही असे
मिश्रित भूतांश पृथक् मुक्ति होउनी
विहरोत स्वेच्छ नव्या मिश्रणांतुनी,
वा स्वयेंचि, वा शून्यीं ! इंद्रधनु तसें
गंङ्गेच्या आकाशीं विपल शोभुनी
विपलांतचि हा माझा 'मी' हि कीं जरी
विश्वाच्या अंतर्हित 'मीं' त मावळे
तरि मरणा ! मरण न तूं ! मरण मुक्तिची !
—विपलांतचि परि ! विनंति इतुकिची असे :
येणें तरि येउनि जा झटकनी तुझा १८०
दुर्लौकिक जो जगांत लोक जो तुझा
द्वेष करिति, तो नचि कीं अससि तूं स्वतः
निर्दय वा निंद्य म्हणुनि—पाहुनी तुला
आलाची कोणीही परत कीं न तो
सांगूं तूं केंवी तें !—परि विशेषतः
मृत्यो ! तूं अप्रियसा जगतिं जें तुझें
सैन्य, पुरस्सर, पीडक हें हिडिस्ससें,
रोगाचें क्रूर असे, त्यामुळेंच कीं !
मीच न कीं परि अजातशत्रु जो जगीं,
तुल्य ज्या प्रियाप्रियादि हानि, लाभ, त्या १९०
भगवान् श्रीगौतमाप्रतीहि भासला
रोग जरा अप्रियची : 'लाभ ना दुजा
आरोग्यासम जगतीं' धर्मपद[1] वदे

---

१ धर्मपद : 'नह्यारोगसमो लाभः संतुष्टिः परमं धनम्' धर्मपद. समर्थांनाही रोग अप्रियच होता. "देहीं चाले आरोग्यता। लाभ नाहीं त्या परता" असें ते म्हणतात.

तरिही जे कोणी तुज नुघडतीलची
स्वेच्छेनें दरवाजे, दुर्ग ते हठी
जिंकुं जीवनाचे तूं धाड धाडही
रोगांच्या सैन्याची गांजत्या तिथें.
मीं तों जीं नुघडतील फोडिलीं तरी
जाणारचि, तीं दारें उघडुनी स्वयें
या माझ्या गेहाचीं, स्वागता असे २००
अनिवार्या सिद्ध तुझ्या ! म्हणुनि शक्य कीं
ये तरि, हे अखिल-वीर-वीर विजेत्या !
एकलाचि अपुरस्सर, आणि अकस्मात्.
परि अशक्य जरि तें तुज एकटें तसें
येणेंची, तरि त्याही क्रूर पीडका
रोगाच्या सैन्याचा क्षोभ सोसण्या
मी असेंचि सिद्ध आजि दोन वत्सरें
पाहतची असती तूं मजसि हा असा
शरपंजरिं खिळला ! ज्या मधुर लागलें
जीवनांतलें मधु, प्रकाश चक्षुतें, २१०
प्रीति हृदा तो मी त्या सर्व सुखांचें
मूल्य म्हणुनि मृत्यूच्या यातनाहि कीं
समजुनि कर्तव्य सहूं सिद्ध असेंची !

अंदमान

## ५१ महासागर

**परिचय—**विनायकरावांनी महासागर नांवाचे सिंधुयुद्ध वर्णन करणारे कांहीं सर्ग लिहिले. त्यांत आरंभीं कथानकाचा नायक आपल्या नौकेवर बसून सागराला स्तोत्रांजलि अर्पण करीत आहे व लौकरच त्यास शत्रूची एक रणतरी दिसूं लागून तिच्याशीं युद्ध करण्याचा प्रसंग ओढवत आहे; हे दोन प्रसंग व्यक्त करणारे स्तबक पुढें दिले आहेत.

वृत्त : वैनायक

विहित-कर्म पुण्यपूत ब्राह्मणांचिया
अंतिम अर्घ्यांसि समादरुनि गभस्ती
भगवान्, आतांचि कुठें पश्चिमेचिया
अंतःपुरचत्वरिं सत्वर प्रवेशती
चुंबुनियां देत मधुर चंचलता ती
विरहोत्सुक दयिते त्या; लालि गुलाबी
गालांतुनि थरथरते; थरथर हृदीं
नवजीवन; नखशिखांत चेतना नवी
म्लानमुखी प्राची घे पदर तमाचा
तिचिया सांजेसि दिवस ये प्रतीचिचा!

२

स्वच्छ शांत गगन नील, शांत-वृत्ति हा
सांध्य-समाधिस्थ तेंवि नील जलनिधी
नौका परि एक मात्र शांत जलीं ह्या
ही प्रवासपटु अशांत गति-युता किती!
कळत काय हे नौके! कीं प्रवास हा

कोठुनि तव आणि कुठे तें तुला बरें ?
" हो हो कविराज, जिथुनि आणि कीं अहा
जेथ तुझा तं प्रवास करिसि : हें खरें
जाणितसां जितुकें कीं मनुज हो तुम्ही
तितुकें तें नौकाही जाणतों अम्ही ! "

३

द्वितला नौकेंत सुदृढ, दीर्घ रम्य या
उच्चतलीं नौयायिन उच्च विचरती ;
भावचि कीं मूर्तिसंज्ञ ते तिचे–दया,
दाक्षिण्य, प्रीति, भीति ! आणि भासती
भासती न अल्पसंज्ञ भाव, ते तया
मध्यतलीं ; आणि तलीं लुप्त-संज्ञसे
कळतांहि न कष्टताति जे सदा तिच्या
धारणार्थ, पाचक परिमार्जकहि तसे
कर्णधार आणि हृदयिं ज्ञात तो तिला
काय, काय नौचा वा हाय अम्हांला ?

४

उपभोगित उच्चतलीं मुक्त वायुतें
त्या नौयायिनजनांत एक हा युवा ;
गंभीराकृति विशालवक्ष वदन तें
ब्रह्मतेज भास्वर उत्साह तो नवा
चिंता कीं राष्ट्राची अखिल कुण्या ते

१ प्रवासी. २ नावेला नावेचा हृदयस्थ कर्णधार ठाऊक होता काय ? आणि आम्हांला तरी ?

धारणार्थची निर्मित तेविं तयाचें
प्रतिभा-संपन्न भाल ! तो तदा तिथें
एकलाचि अनेकांत मंत्रमय वचें,
गगनाखालींच गगनसम उदारशा
प्रणमितसे कवण महच्छक्तिच्या यशा !

* * *

सहसा तों नौकेचे नयन-दिपविता
तेजस्वी लकलकाट गगनिं कोंदला,
तामसिचा गर्भपात होउनी यथा
एकाएकींच दिनभ्रूण सांडला
भेदुनिया घनतमासि, घाबऱ्या तया
नौकेतें एकवटुनि खिळुनिया धरी
ती प्रकाशलेखा घटि-मात्र, जेंवि या
चांदीचा तो खिळाचि घुसत अंतरीं
जों जों त्या चुकवूं ती निसटते तरी
तीक्ष्ण किरण तों तों तिकडेच तीवरी

२

आतां तों उंच खणाणणत हटकते
कर्णेही थांबथांब करित वाजती ;
होय मराठेचि ! मराठेचि ! ते—तिथें
किरण चंद्रज्योतीचे जिथुनि फांकती
लव थांबत, लव धावत, नाव शेवटीं
थांबलीच, सन्निध येतांचि रिपुतरी,
ध्वनि दे कप्तान ‘ महाराष्ट्रभूपति—
नौवाहाही सलाम आंग्लनौ करी ’

'प्रतिप्रणाम!' म्हणत महाराष्ट्र-रण-तरी
अडकवुनी सादरची तरि तिला धरी

* * *

धडड धडड तोफा तों आग ओकल्या
सहसाची सुटति आंग्लरणतरींतुनी
बुझति चंद्रज्योति आणि पेट घेति त्या
ज्योती रणतेजाच्या हृद्‌हृदांतुनी
कर्ण्यांतुनि उंच उंच उभवुनी भुजा
ध्वनि ध्वनति 'या! असाल तिथुनि मराठे
'धजा वीर धजा वीर वीर हो धजा!'
दुमदुमुनी शतशत तों दुंदुभी उठे
धडड धडड तोफेवरि तोफ ती सुटे
शतदां अंधेर समय चमकुनी उठे!

अंदमान

## ५२ अटकेवर जरीपटका

**परिचय**—गोमांतक महाकाव्याचे उत्तरार्धात, राघोबादादांनीं अटकेवर हिंदूंचा भगवा ध्वज लावल्याची बातमी महाराष्ट्रांत येऊन थडकतांच ती चहूंकडे कशी पसरली व गोमांतकांतील भार्गव गांवींही शुद्धिसमारंभ चालू असतांनाच कशी पोचली हें सांगितलें आहे. ही बातमी खड्या आवाजांत ज्या विजयगीताचे द्वारा महाराष्ट्रभाटानें जमलेल्या श्रोतृवृंदास ऐकविली तें हें विजयगीत आहे.

मराठ्यांचे विजयाचीं गीतें महाराष्ट्रभर गोंधळी गात असले पाहिजेत. या पवाड्यांत आलेले विचार काल्पनिक नसून ते ऐतिहासिक दृष्ट्या खरेखुरे आहेत हें परिशिष्टांत दिलेल्या पत्रांवरून कळून येईल.

[ फटका

ऐका ऐका हिंदुमात्र हो! वार्ता विजयाच्या आल्या;
उभ्या सात शतकांचा उगवे सूड जिंकिलें जेत्याला

हिंस्र हार जी वीर दाहिरा[1] दाही तुजला तैं तीची
सह्याद्रीच्या व्रणव्यामाजी राख होतसे घे आजी!

पळूनि जय जो जयपाळा[2] तव हाय हातिंचा तैं गेला,
आज फिरुनि ये तुझ्या घरा तो घालित लोटांगण आला

हाय लाविली भारत-वीणा व्यासें गाया त्या समरा
बंधुबंधुच्या रक्तें रंगत ज्यांत भारती जन मेला

---

१ दाहिर-सिंधूचा शूर राजा मुसलमानी पहिल्या विजयी हल्ल्यांत झगडून रणीं बळी पडला. २ पंजाबच्या प्रसिद्ध जयपाळानें मुसलमानांशीं लढण्यांत अपजय आल्यानें अग्निकाष्ठें भक्षून देहान्त प्रायश्चित्त घेतलें.

हाय हाय शतवार हाय हा! भारतवीणे बरदाई
जागवि पुनरपि–परि ती गाई भारतशत्रूंच्या विजयीं          १०

ज्याच्या ज्याच्या कटुकर्तव्यचि दैवीं ये हें उरफाटें
हतवीरांच्या गात हताशा रासोंचा त्या उर फाटे

अश्रू परि ते पूर्वकवी हो, हिंदवि पडत्या काळाचे
तेच फुलविती गीत आज हें हिंदवि चढत्या काळाचें

धन्य भाग्य मम! आज न मजला गाणें जातिघ्नाहि रणा
अहिंदु-हस्तें घडल्या किंवा घोर हिंदवी संहरणा

देवारींच्या देशारींच्या न्याय्य गाउनी निःपाता
धन्य भाग्य मज आदिकवीच्या भाग्यीं घेऊं ये वांटा

धन्य भाग्य ह्या गात्यांचें, तें धन्य भाग्य या श्रोत्यांचें
जयार्थ मरत्या लढत्यांचें, या वांचुनि विजया बघत्यांचें          २०

जयजयकारें भरा अंबरा करा घरोघर महोत्सवा
परम मांगलिक, हिंदुमात्र हो वार्ता ये आतांचि नवा:

हिंदू-वीरांचा कीं श्रीशें असे यशस्वी हट केला
आज हिंदवी जरिपटका कीं पुन्हा पोंचला अटकेला!

२

घडलें म्हणुनी घडलें होत न सामान्यचि वा तें सोपें;
शंकांव्याकुल महदाश्चर्यें हृदय सुखभरें थरकांपे!

---

१ चंदभाटाला बरदाई म्हणत. रासो–रजपुतांचे भाटांनीं गाइलेल्या इतिहासांना 'रासो' म्हणत. ३ वाल्मीकि कवि. आर्यांच्या शत्रूंवर विजय मिळविल्याचें महाकाव्य असें एक रामायण; तें गाण्याचें भाग्य वाल्मीकींना मिळालें होतें.

स्वयंपूतही वेदर्षीनीं निज देहावरि जया जला
प्रोक्षणिं मार्जनिं सिंचियलें कीं भिजवुनि भिजवुनि कुशांकुरा

पूत पावना जलांत देउनि पाय सिंधुच्या तयाच हा
शिकंदर करी कलींत त्यासी गढूळ सहसा जई अहा !          ३०

वीर भारती तीर्थरक्षणा मागधांतुनी धावत ये,
घुसले त्याहुनि शीघ्र पळवितां परां मारिला घाव तयें

अन्य कुणाचा असो शिकंदर; परंतु भारत-जेता ना.
अंगणही ना तयें देखिलें कळलाही ना कुणा कुणा !

राजदूकुलांचलासि किंचित् करस्पर्श ना जों केला
क्रुद्ध दृष्टिनें भारतभूच्या भस्म होउनी रिपु गेला

यावरती ही परकी सेना अंगणींच ना परि पहिल्या
राजमंदिराच्याची चौकीं हाणित मारित कीं घुसल्या.

घुसल्या चौकीं पहिल्या; परि ना पुढें एकही पद धावूं
आल्या तैशा परत्या किंवा जिवंत शकल्या ना जाऊं          ४०

आ पसरील्या तिमिंगलाच्या गळ्यांत मासे भराभरा
घुसती वेगें : परंतु परतें कोण तयांतुनि जात घरा !

मर्दी यवना पुष्यमित्र त्या मर्दी विक्रम शका तसा
मर्दी हूणा यशोधर्म कीं राम रावणाप्रती जसा

जो जो मागें आला आसुर शक्तींच्या कीं भरावरी
भारतीय यज्ञाश्व नाचला त्याच्या त्याच्या उरावरी

कुठें आज ते शक ? ते बर्बर ? बाह्लिकही ? वा हूण कुठें ?
भारत-जठराग्नींत जळोनी भस्म जाहले द्रुत ते ते

गदाप्रहारीं भारतीय तद्गर्व-वक्रता सरला ती
होय आणि तद्बर्बरताही भारतयज्ञाग्नींत सती ! ५०

आसुर सेना सगळ्याही त्या कधीं न गंगा तरल्याची
विंध्याद्री वा वलांडावया जिवंत समरीं उरल्याची

हंत हंत परि पूर्वी घडलें कधींही न तें घडे कसें
हंत कशी ही तुटे आमची धार बोथटे खड्ग असें

संचित पापांची कीं अमुच्या मूर्तिमती ती प्रतिक्रिया
महंमद तसा भंगित मूर्ती, भ्रष्टवीत ये सती स्त्रिया

राजमंदिराच्या कीं पहिल्या चौकींची ना परी अहा !
थेट राजसिंहासनपीठीं शत्रु नागवा नाचत हा !

सिंधुपासुनी हंत सिंधुपर्यंत हिंद-भूमींत उडे
प्रथमचि परका ध्वज अप्रतिहत ! कधींहि न घडे तेंचि घडे ! ६०

ध्वजची उडता, तरीहि अवघड नव्हतें तितुकें : कुठें कुठें
काडीचेची राजध्वज की मोडति काडीसमची ते

परंतु खंजिर इस्लामाचा गेला इतका खोल हृदीं
कीं जातीच्या आत्म्यासीची दुभंग करुनी घुसे मधीं

त्या घावानें विव्हल पाहे हिंद कोसळूं पदोपदीं
उभीं सात शतकें तें सललें शल्य सारखें तिच्या हृदीं

परी आज तें शल्य उपटलें आज तोडिला ध्वज तो रे
आज जिंकिली हीहि लढाई, आजि महंमद-मद उतरे

---

१ युद्धांत जिंकिल्या जाऊनही देशांतून हुसकून देतां आल्या नाहींत अशा अनेक परकीय जाति 'भारतयज्ञाग्नींत' म्हणजे शुद्धियज्ञांतून शुद्ध करून हिंदुधर्मांत नि हिंदुराष्ट्रांत पचवून टाकल्या.

चंद्रगुप्त जें पुष्यमित्र जें, विक्रम-विक्रम दूर करी
शतपट दुर्घट संकट त्याहुनि निरस्त आजी श्रीश करी ७०

समर्थ बघती रात्रीमाजी ज्याच्या नुसत्या स्वप्नाला[1]
योग हिंदुपद्पातशाहिचा आजी प्रत्यक्षचि आला

सिंधुपासुनी सेतुबंधपर्यंत मिळेना तोय जयां
होय उदंडचि तोय शुद्ध करुं आज स्नानसंध्येसि तयां

घडलें म्हणुनी असें न समजा सामान्यचि वा तें सोपें
घडलें तरिही हृदय कुशंका-व्याकुळ सौख्यें थरकांपे

जयजयकारें भरा अंबरा करा घरोघर महोत्सवा !
मांगलिकां कीं हिंदुमात्र हो वार्ता ये आतांचि नवा :

हिंदूवीरांचा कीं श्रीशें असे यशस्वी हट केला
आज हिंदवी जरिपटका कीं पुन्हा पोंचला अटकेला ! ८०

३

सामान्य न तो इतुकेंची ना, परी विजय ना हा आला
लागुनि सहसा ओझरता शुभ दैवाचा वा फटकारा

आकस्मिक ना जय हा ! किंचित् बलिदानाची आठवही
भावें दाटुनि आणिल कंठा ; कशासि व्हावी पाठ वही

सिंधुपासुनी सेतुबंधपर्यंत हिंदभू होय जईं
निर्वीरा, निर्देवा, निर्द्विज निस्सिंहासन हाय ! तईं

कोनामाजी सह्याद्रीच्या एका कांहीं तरुण गडी
घेउनि भारे गवताचे रे होते एक्या चढत गडीं

---

१ समर्थाचें स्वप्न या नांवाची त्यांची प्रसिद्ध कविता.

गोसाव्यानें एका तों ती फुंक मारिली दूरवरी
फुंकीसरशीं पेट घेतसे सह्याद्रीची दरी दरी ९०

गवताच्या त्या काडीकाडींतुनि कीं म्यानांतूनि वरी
तशी घुसत तलवार तळपली तरुणांच्या त्या करीं करीं

आणी भारे गवताचे रे घेवोनी जे तरुण गडी
होते वरती चढत जाहले राजे तेची तया गडीं !

सह्याद्रीच्या कोनामाजी स्वतंत्रतेची ध्वजा करीं
शूर शिवाचा संघ जिवाचा उभवूं ऐसें धाष्टर्य करी

दिनापासुनी तया भूमिची तसूतसूही लढवीली
स्वतंत्रतेची ध्वजा झुंजवित गडोगडीं ही चढवीली

प्रतापगडिच्या देवीपुढती कसा आठवा दिला बळी
बत्तिस दांतांचा तो बोकड लुटुनी कुटुनी परोपरी १००

चार हजारांवरी शत्रुचा घोडा धरिला त्या समरीं
पुढें रांगणा विशाळगडिची झुंज आठवा अल्प तरी

बाजी पडला, पडला वीरा वीर सांवरित परोपरी
बाजी पडला परी पडूं ना दिलीच बाजी वीरवरीं

चाकणासि तों कणाच मोडे रिपुगर्वाचा, पडे गढी
नरसाळ्याची नरसिंव्हाळी गढीहुनी दे बला दिढी

वर्षामागुनि वर्ष कोंकणीं सिद्दीची तरवार-सुरी
गायगरीबा चिरिती, होई बोथट राजापुरावरी

षाइस्त्याच्या बंगल्यांतली दंगल ती त्या तमांतली
सिंहगडाचें प्रकाशांतलें तत्स्वागत तें अनंतरीं ११०

विजापूरचे सहा हजारांवरती पडले भूमिवरी
रणीं आणि तितुकेचि शत्रु त्या कोंकण-युद्धीं जलांतरीं

आठवोनि तें पुढें आठवा सर्वेचि मुहकमसिंग करी
धर्मद्रोहा कशा अर्पुनी औरंग्याच्या स्वत्व करीं

म्लेंच्छमैत्रिचें रणांत देहान्तचि तो प्रायश्चित्त करी
दहा हजार प्रताप आणी घोडा रिपुचा धरुनि करीं

पुरंदरींच्या मुराराचिया बलिदानासी दे समरीं
सिंहगडाचा तांतडिचा तो डाव तोडिसी तोड भली !

तीन हजारांवरती तुटुनी भरतां मोंगल तरवारी
दाउदखाना पळतां थोडी चांदवडाची भू झाली १२०

साल्हेरासी करी मराठा दिल्लीराची जान ढिली
हिंदुगदा रिपु चेंदुनि पाडी दहा हजारांहूनि वरी

कसूर काढूं उंबराणिची जेसूरीच्या जया स्थलीं
लढुनी शूर प्रताप त्या कीं शेता राष्ट्रक्षेत्र करी

सावनूरचा मार आठवुनि निजाम चरके आजवरी
'गांठ मराठ्यांसह ना पुनरपि पडो ईश्वरा' रडे अरी

संगमनेरीं रणमस्तांची रणांत मस्ती जिरवीली
हिंदुस्वातंत्र्याची द्वाही दिशादिशांसी फिरवीली

शूर शिवाची दहा जिवाची गुप्तमंडळी ती पहिली
एक्या प्रबळा राष्ट्रमंडळामधें प्रकाशीं परिणमली १३०

पठाण मोंगल तुर्क इराणी-दाढी तितुकी सामोरी
पुर्तुगिज वलंदाज फिरंगी टोपी तितुकी पाठिवरी

परि तितुक्यांहीसहित मराठा-वीर दुहेरी झुंज करी
एक्या हस्तें उपटित दाढी टोपी उडवी दुज्या करीं !

मुख्या वीरा येसाजीला घाव लागला हाय ! तरी
पुर्तुगिज-शिरें टक्करींत रे फोंड्यावरती फोडियलीं

हंबीरानें मारित मारित मरोनि वांईच्या समरीं
समर्थगुरुची केली शिष्यें कृतींत उक्ती खरी खरी

धर्मासाठीं वीर हुतात्म्या संभाजी, तूं पडुनि बळी
तुझींच ना परि पापें अखिला राष्ट्राचीं प्रक्षाळियलीं १४०

मालेराई, राव धनाजी, ते संताजी, उच्चारी
एकेका, या एकेका मी युद्धाचा उच्चार करीं

युद्धामाजी एकेका ज्या गर्भित झुंडी शतावरी
छापे, धावे, तुमुल लढाया, पृथक् कथाव्या कोठवरी !

शरणीं न रिघूं[1] सरणीं जळल्या सती सातशें जळणारी
विशाळगड ती ध्वजा फडकवी दुज्या चितोडाचियापरी !

कासम मेला श्वास कोंडुनी दुडेरिच्या संगरावरी
बसवपट्टणा हिम्मतखाना वधी मराठा धारकरी

सेनेमागुनि सेना रिपुची जिंजीभंवतीं मारियली
भूल पाडुनी झूलफिकिरखानासि धूळची चारियली १५०

नारोपंत प्रमुख वीर रिपु-करास पडती स्वयें बळी
म्लेंच्छशक्ति परि हौतात्म्यें त्या अंतिम विजया आंचवली !

हौतात्म्येंची त्याच्या त्याच्या घेउनि जो तरवार करीं
पडला झुंजत रणांत राष्ट्रस्वातंत्र्यास्तव धारकरी

---

१ शरण जावें लागूं नये म्हणून.

पाइक हो तो नाइक हो तो स्मृत वा विस्मृत धारकरी
हौतात्म्यासी त्याच्या त्याच्या वंदन मी शतवार करीं

करीं वंदना प्रयागजीच्या पराजया मी परोपरी
पराजयाची महती ऐशा कितीक विजयांहूनि खरी !

घेउनि भारे गवताचे रे गढी जिंकिली कशी तरी
त्यांच्या जाती सेना चढुनी गाजत वाजत दिल्लिवरी　　१६०

वीर पंधराशें तूं कापुनि काढिसि सहसा खरें परी
घुसला जात न दिवाणखासा[1] पाय मराठा माघारी

परंतु हिंदुद्वेपी जन हो, सावध आतां मात्र परी !
प्रधान आजी झाला बाजी[2] महाराष्ट्रमंडळांतरीं

मात हिंदुपदपादशाहिविण बोलूं देचि न तो दुसरी
किन्नरखंडीं हिंदुध्वज तो रोवुं होतसे हांवभरी !

पालखेडसी निजाम पिटिला, अली पिटिला बंगालीं
अर्काटासी नबाब पिटिला, पिटिला शिद्दी जलीं स्थलीं

चिपळूणासी, विजयगडासी, मार दिला त्या जसा स्थलीं
तसाच पिटिला जो जो आला शत्रु आडवा तया जलीं　　१७०

श्रीगांवीं तो मर्दुनी सेना दहा हजारांचिया वरी
शिरच्छेदची सिद्दीचा त्या श्रीचिमणाजी वीर करी

हिंदुछळाच्या प्रायश्चित्ता हबशी जों ना पुरें भरी
पाप-प्रायश्चित्त-गदा तों पुर्तुगिजांच्या पडे शिरीं

ठाणें, माहिम, तारापुर त्या झुंजी सांगूं कोठवरी !
वसईच्या तों पराक्रमाची ख्याति उभ्या या जगत्तलीं

---

१ दिल्लीचा बादशाही वाडा. २ पहिले बाजीराव पेशवे.

पेटलादला, सारंगाला, तिरेला, जो जो लढे अरी
माळव्यांत तो मुकला प्राणा म्लेंच्छभृत्य रणरणांतरीं

बादशहाच्या बादशाहिची जाळुनि दाढी दिल्लिवरी
होता कीं नव्हतासा केला निजाम पिटुनी भोपाळीं १८०

बुंदेल्यांचा पक्ष घेउनी बंगष पिटला जैतपुरीं
हिंदूंचा सत्पक्ष घेउनी अहिंदु पिटिला जलीं स्थलीं

म्हणुनि चढुनि ये म्लेंच्छमोचना इराणांतुनी नवा खळी
परंतु नादिर सहसाची तें रण सोडुनि घर जवळ करी

तोंची बाजीराव जहाले हाय! दिवंगत महाबळी
परी पित्याहुनि पुत्र धुरंधर महाराष्ट्रपदाधुरा धरी

दशरथ देउनि राज्यश्रीसी रामलक्ष्मणाचिया करीं
प्रभाततारा देउनि जाई कांति आपुली सूर्यकरीं

तशीच बाजीरावें हिंदुस्वातंत्र्याची ध्वजा दिली
या नरवीरा नानांच्या, या भाऊंच्या दुर्दांत करीं १९०

रोवी हिंदुध्वजा शिवाजी शूर पिढी त्या रायगडीं
पिढी बाजिची झुंजवीत ने तिला थेट चंबळेवरी

नरसिंह श्रीनानांची तों महाराष्ट्र-मंडळी परी
रोविति हिंदुस्वतंत्रताध्वज शत्रूच्याची उरावरी

पठाण, मोंगल, तुर्क, इराणी, हबशी, शिद्दी, परोपरी
पुर्तुगिज, वलंदाज, फिरंगी, इंग्रेजादिक गौर खळी

इराणपासुनि फिरंगाणपर्यंत शत्रुची उठे फळी
सिंधुपासुनी सेतुबंधपर्यंत रणांगण-भू झाली

---

१ तिरल गांवीं.

तीन खंडिंच्या पुंडांची त्या परंतु सेना बुडवीली
सिंधुपासुनी सेतुबंधपर्यंत समरभू ळढवीली ! २००

आठवण मला त्याची देणें तुम्हांसि नलगे अशा स्थलीं
प्रत्यक्षचि ती असेल सरशी तुम्हांत बहुतीं पाहियली

तुम्हांत असतिल बहुत वीर जे स्वयें झुंजले त्या समरीं
नाइक ऐसे, पाइक ऐसे, मर्द मराठी धारकरी

कथोत ते ते सरशी आजी आकस्मिक कां ही झाली ?
विजयश्री का केवल चुकुनी घरा आमच्या ही आली ?

आकस्मिक ना अहो भूमिची तसूतसूही ळढवीली
हिंदुस्वातंत्र्यार्थ रणरणीं रास शिरांची चढवीली !

संतत शोणित-तर्पण-धारा धरीत आली पिढीपिढी
हविर्भुजाची रणकुंडांतिल आग त्रिपल ना विझूं दिली ! २१०

समर्थसम जे योगी करिती महातपस्या तपोबली
अमात्य, मंत्री, प्रधान करिती सूक्ष्ममंत्रणा मंत्रबली

हणमंते, प्रल्हाद निराजी पंत आणखी परोपरी
ल्हान मोठा शतशत कर्ता मुक्तिसमरिचा धारकरी

तपें तयांच्या, जपें तयांच्या, उपदेशें त्या प्राणविली
मंत्रयुक्तिनें प्राणविली त्या शस्त्रशक्तिनें त्राणविली–

–ती ही आजी जन्मा ये जी हिंदु-शक्ति नव जगत्तलीं
जन्म द्यायला जिला साधना महाराष्ट्र दृढ अशी करी

जयजयकारें भरा अंबरा करा महोत्सव घरोघरीं
मांगलिका कीं हिंदुमात्र हो वार्ता आतांची आली २२०

हिंदूवीरांचा कीं श्रीशें असे यशस्वी हट केला
आज हिंदवी जरिपटका कीं पुन्हा पोंचला अटकेला !

* * *

करा महोत्सव हिंदुमात्र हो ! तुमच्या हौतात्म्यें आला
विजय तयाच्या महोत्सवाचा हक्कचि आहे तुम्हांला

परंतु जिंकुनि आलां जे जे असामान्य ज्या विजयाला
ते ते विसरूं नका वीर हो त्याचि जयोत्था नव भारा

चंद्रगुप्त ज्या, पुष्यमित्र ज्या पुत्र गौतमीचा स्वकरीं
करी राष्ट्रसंकटासि पूर्वी निरस्त त्याहुनि तुम्ही जरी

शतपट दुर्घट संकट हरुनी शककर्त्या त्या वीरवरा
वंशज व्हावें तसेंच विक्रमशाली शोभा या काला　　　२३०

तथापि अजुनी कार्य न सरलें इच्छित, हातां तट आला
परंतु अजुनी चढुनि दुर्ग हा कुशल पोंचणें असे घरा

आज हिंदुपद-पादशाहिचा योग सत्यची हा आला
तथापि अजुनी समारंभ तो संपुनि निर्विघ्न न गेला

शककर्त्यासम सत्यचि आम्हीं धन्य विजय हा उपार्जिला
शककर्त्यासम विजय परंतू करीं पाहिजे राखियला

शल्य उपटलें परंतु भारी घाव न भरुनी हा आला
कुठें हूण ते ? जसें तसें न क्षमता अजुनी पुसण्याला

चक्रव्यूहा देवारींच्या भेदुनि शौर्यें जरि गेला
तरी परतुनी येणें आहे सजय त्यांतुनी माघारा　　　२४०

अमंगल टळो पूर्वस्खलनें सावध होउनि या काला

सारथि[1] तो अविलंबित देतो साथ धावुनी आम्हांला.
आणि जयांही चक्रव्यूहा देवारींच्या भेदियला
सजय परतुनी भोगुत चिर ते धर्माधिष्ठित वसुंधरा

सशस्त्र समराभिषेक जैसा हिंदुश्रीसी हा झाला
सशास्त्र सिंहासनाभिषेका तिच्या पाहुं द्या आम्हांला

राष्ट्रासी या, धुरंधुरां या, जया जसें या वरण्याला
प्रभो, महाबल तसेंच दे या जयोत्थ भारा धरण्याला

याहिवरी जी ईशेच्छा ती घडेल—परि हा घडलेला
पराक्रम महत्कर्मे हीं हा असामान्य जो जय आला　　२५०

व्यर्थ न तो जाईल कधींही दिन हा हिंदवि राष्ट्राला
सच्छक्तीचा, सत्स्फूर्तीचा स्रोत सततची कीं झाला

आज सात शतकानें विजयी मिरवित सोनेरी तोडा
पिई सिंधुचें पाणि पुनरपी हिंदु सैनिकाचा घोडा

सागरसंगत भागीरथि ये कावेरीच्या पूत जला
सिंधु, शतद्रु, त्रिवेणि, यमुने, गोदे, कृष्णे या सकला

हे तीर्थांनो, हे क्षेत्रांनो, अखिल भारतीभूमिंतल्या
हरिद्वार, कैलास, काशिके, पुरी, द्वारके या साऱ्या

ऐका ऐका रोमहर्षणा वार्ता विजयाची आल्या
उभ्या सात शतकांचा उगवुनि सूड जिंकिलें जेत्याला . . २६०

हिंदूवीरांचा कीं श्रीशें असे यशस्वी हट केला
आज हिंदवी जरिपटका कीं पुन्हा पोंचला अटकेला !

रत्नागिरी

---

१ सारथि—अर्थात् श्रीकृष्ण. चक्रव्यूहकथेशीं संदर्भ सूचित आहे.

## ५३ हिंदूंचें एकतागान

**परिचय**—हें पद अखिल हिंदु मेळ्यासाठीं प्रथम शिरगांवीं रचलें. पुढें तें मोठमोठ्या सभांतून ब्राह्मणांपासून महारभंग्यांपर्यंत हिंदूंच्या हजारों नरनारींनीं एककंठानें म्हणण्याचा परिपाठ महाराष्ट्रभर पडून तें एक वृंदगीत होऊन बसलें आहे. इतर भाषांतूनही तें अनुवादिलें गेलें असून अनेक प्रांतांत गाइलें जातें.

[ चाल : तूं टाक चिरुनि ही मान०

तुम्ही अम्ही सकल हिंदू । बंधुबंधू
तो महादेवजी पिता आपुला चला तया वंदूं ॥ ध्रु० ॥

ब्राह्मण वा क्षत्रिय चांग । जरि झाला
कसलेंहि रूप वा रंग । जरि त्याला
तो महार अथवा मांग । सकलांला
ही एकचि आई हिंदुजाति आम्हांस तिला वंदूं ॥ १

एकची देश हा अपुल्या । प्रेमाचा
एकची छंद जीवाच्या । कवनाचा
एकची धर्म हा आम्हां । सकलांचा
ही हिंदुजातिची गंगा आम्ही तिचे सकल बिंदू ॥ २

रघुवीर रामचंद्राचा । जो भक्त
गोविंदपदांबुजिं जो जो । अनुरक्त
गीतेसि गाउनी पूजी । भगवंत
तो हिंदुधर्मनौकेंत बसुनिया तरतो भवसिंधू ॥ ३

उभयांनिं दोष उभयांचे । खोडावे
द्वेषासि दुष्ट रूढीसी । सोडावें
सख्यासि आईच्यासाठीं । जोडावें
अम्हि अपराधांसी विसरुनि प्रेमा पुन्हा पुन्हा सांधूं ॥ ४

लेंकुरें हिंदुजातीचीं । हीं आम्ही
आमुच्या हिंदुधर्मासी । त्या कामीं
प्राणही देउनी रक्षूं । परिणामीं
या झेंड्याखालीं पूर्वजांचिया एकाची नांदूं

रत्नागिरी, १९२५

## ५४ अमुचा स्वदेश हिंदुस्थान

**परिचय**—रत्नागिरीच्या अखिल-हिंदु-मेळ्यांतील पद.

[ चाल : तूं टाक चिरुनि० सारखी

अमुचा स्वदेश हिंदुस्थान
आम्हां हिंदूंचा तो केवळ, होय जीव कीं प्राण ॥ ध्रु० ॥
देवालय हें पवित्र अपुल्या । देवाचें सुमहान
वाडवडीलांचें हें मंदिर । स्वर्ग मृतांचा जाण
चिल्यापिल्यांची दाई अपुल्या । देइ दुधाचें पान
फुलांफळांनीं डवडवलेलें । प्रेमाचें उद्यान
सत्ता अपुली मत्ता अपुली । ही रत्नांची खाण
कुणी हिरावुनि नेऊं बघतां । रक्षुं अर्पुनी प्राण

रत्नागिरी, १९२५

## ५५ दिपवाळीचें लक्ष्मीपूजन

**परिचय**—हें पद दिवाळींत परदेशी फटाके वगैरे विदेशी वस्तूंवर बहिष्कार घालण्याचा उपदेश करीत फिरणाऱ्या रत्नागिरी-हिंदुसभेच्या-मेळ्यासाठीं केलें होतें.

[ चाल : चंद्रकांत राजाची०

लक्ष्मीपूजन करूं घरोघर आम्हीं जरि भावें
प्रसन्न पूजेनें ना होतां लक्ष्मी रागावे

आणी इंग्रज पूजी जरि ना लक्ष्मीची मूर्ती
राबे ऋद्धीसिद्धी त्याच्या दाराशीं तरि ती

काय बंधुंनो, कारण ? रुसली भारतलक्ष्मी कां ?
लाथाडुनि दे पूजा अमुची शतकांची देखा

कारण आम्ही सुमें अर्चितों परि ना सुमनानें
विनवूं परि ना विष्णुसम तिला जिंकुं विक्रमानें

लक्ष्मीपूजन करावया जैं करितों स्नानाला
परका साबू, परकीं तेलें लावूं अंगाला

परदेशीचें रेशिम त्याचा मुकटा नेसोनी
देवघरीं परदेशी रंगें रंगित बैसोनी

विदेशांतली साखर घालुनि नैवेद्या दावूं
अशा पूजेनें प्रसन्न होइल लक्ष्मी हें भावूं

साबू नेई कोटी, कोटी तेल रुपाया ने
नेइ लुटोनी विदेश कोटी अन्य उपायानें

विलायती जी साखर नैवेद्यासी लक्ष्मीच्या
आणियली ती नेत विदेशा कोटी रुपयांच्या

अशा रीतिनें लक्ष्मी दवडुनि दाराबाहेरी
लक्ष्मीपूजन करीत बसतों आम्ही देवघरीं

आणि विदेशी नळे फटाके फुलबाजा अंतीं
उडवुनि डिंडिम पिटूं आपल्या मौर्ख्याचा जगतीं

अहो हिंदुनो, कोटि कोटि रुपयांची या दिवशीं
लक्ष्मी पूजावयासि लक्ष्मी धाडुं विदेशासी

म्हणुनि आम्हि जरि पुजूं घरोघर ही लक्ष्मी भावें
प्रसन्न पूजेनें ना होतां लक्ष्मी रागावे

तरी हिंदुनो घरांत लक्ष्मी आधीं आणावी
विदेशीसि ना शिवूं शक्य तों वृत्ती बाणावी

देशी तेलें, देशी साबू, देशी वस्त्रानें
देशी साखर, देशी अस्त्रें देशी शस्त्रानें

स्वदेशलक्ष्मी पूजूं साधुनि जरि मंगल वेळ
गजांतलक्ष्मी हिंदुहिंदुच्या दारीं डोलेल !

रत्नागिरी, १९२५

## ५६ जा झुंज !

[ चाल : भूपती खरें तें वैभव

निजजाति-छळानें हृदय कां न तळमळतें ?
तुम्हि तरुण शिरांतुनि रक्त नवें सळसळतें

हें नवें रक्त तों विजेहुनी पेटावें
मृत्यूसि तुम्हीं गांठून बळें भेटावें

मग मुकुट आपला कोणीं । फोडिला
हिंदूंचा झेंडा कोणीं । तोडिला
आशेचा अंकुर कोणीं । मोडिला

हें चिंतुनि चिंतुनि क्रुद्ध आंसवें जळतीं
दिनरात्रीं डोळ्यांतुनि कां न रे गळती ? १

या भारतभूस्तव समररंगणीं गेले
या चिंतेनें बहु वीर लढुनिया मेले

कुणि घोर यातनांचिया चितेवरि जळले
कुणि फांस गळ्यासी लागतांहि ना ढळले

त्या त्यांच्या अपुऱ्या इच्छा । या क्षणीं
तुम्हांसि बाहती हांका । फोडुनी
कां ऐकूं येती कोणा । यांतुनी

जरि येति तरी रे ऊठ कोण जो तो तूं
घे करीं शिरा जा झुंज पुरव तो हेतू २

रत्नागिरी, १९२६

## ५७ माळ गुंफितांना

[ चाल : पडला अभिमन्यु०

माळ गुंफितांना । ऐका कवनाला । गुंफी कोण कशी माला
घाली जगदंबा । त्रिगुणातीताला । त्रिगुणी बिल्बदली माळा
प्रकृति देवि गुंफी । देव विराटासी । नव नव सूर्य-मालिकांसी
प्रलयंकर काली । गुंफि महाकाला । ती नरमुंडचंडमाला
उद्भवा घाली । घालि उद्‌भवाला । सृष्टि भूकंपांची माला
गुंफि सत्यभामा । श्रीहरिला साची । माला पारिजातकांची
माळ मोत्यांची । गुंफी रुचिरा ती । राणी राजाच्यासाठीं
फुलांची माळा । माळा ओंवि रती । आलिंगि त्या अनंगा ती
विरहिणी परि ती । प्रिय-स्मरण-काला । ओंवी अश्रूंची माला

रत्नागिरी, १९२६

## ५८ सुखशय्यापलंग

**परिचय**—मोरोपंतांचे वंशज श्री. रा. द. पंतपराडकर यांनीं विनायकरावांस एक लोहपलंग ‘ सुखशय्यापलंग ’ असें नांव देऊन भेट म्हणून दिला. त्यावर त्यांनीं खालील आर्या लिहिल्या होत्या :

“ हिंद तपस्वीच गमे सावरकररूप घेउनी भेटे
आर्याकेकास्वाहाकारीं मजला चढेच्चि बळ मोठें
हा सुखशय्यामंचक प्रेमे सावरकरांसि आहेर
देतो मयूरवंशज ज्यासि रुची एक आंत बाहेर ”

राममंदिरांत ते आर्याकेकावलीचें आवर्तन करणार होते यालाच वर त्यांनीं स्वाहाकार म्हटलें आहे. त्या त्यांच्या भेटीचा स्वीकार करणारें हें पुढील आर्याबद्ध पत्र विनायकरावांनीं धाडलें.

आपण मयूरवंशज, कविचा त्या भक्त तो पुरातन मी
तुम्हांस, त्यांसि सन्मानाया जोडूनिं आजि हात नमीं

आर्याकेका-स्वाहाकारीं सांप्रत असां सदा सजला
पंत पराडकर तुम्ही ऐकुनि आनंद होतसे मजला

जों ध्येय प्राप्त न तें, जों न असे राष्ट्रपाश हा तुटला
हा हिंदुजाति-गौरव-रवि ना राहुग्रहांतुनी सुटला

हें आंथरूण तोंवरि आपण जें अर्पिलें उपायनसें[1]
तें ती[2] निद्रा देवो कर्तव्या जीमधें अपाय नसे

करण्या पुनरपि युद्धोद्युक्तचि निजवूनि देह हा दमला[3]
ही सुखशय्या उठवो रणशय्येसमचि निरपवाद मला

रत्नागिरी, १९२६

१ भेट. २ ती निद्रा–पलंगाचें नांव ‘ सुखशय्या ’ होतें. त्या नांवाविषयीं कवीचें उत्तर आहे कीं ती ‘ सुखशय्या ’ असली तरी जोंवर हें हिंदुजातीय राष्ट्रस्वातंत्र्याचें ध्येय प्राप्त झालें नाहीं तोंवर त्या शय्येनें मला रणशय्या ’ देते तितकाच विसावा द्यावा. प्रत्यहींच्या युद्धांत दमलेला देह उदईकच्या युद्धाला तोंड देण्यास अधिक समर्थ व्हावा इतक्याचपुरती निद्रा वेळांत वेळ काढून झुंजत्या सैन्यांतील सैनिकास जशी घेऊं देतात–तितकीच मला मिळो. ध्येय साध्य झाल्यावर मग ही संपूर्णपणें ‘ सुखशय्या ’ होवो : तोंवर ती रणशय्याच होवो. ३ कवि त्या वेळेस जन्मठेपेच्या कारागारांतून नुकतेच सुटलेले होते. त्या ‘ दमण्याचा ’ उल्लेख पराडकरांच्या पत्रांत होता. तोच इथें सूचित केला आहे.

## ५९ अखिल-हिंदु-विजय-ध्वज-गीत

[ चाल : आकळे न अघटित घटना०

अखिल-हिंदु-विजय-ध्वज हा उभवुं या पुन्हा ॥ ध्रु० ॥

या ध्वजासची त्या काली । रोंविती पराक्रमशाली
रामचंद्र लंकेवरती । वधुनि रावणा १

करित जैं शिकंदर स्वारी । चंद्रगुप्त ग्रीकां मारी
हिंदुकूश-शिखरीं चढला । जिंकुनी रणा २

रक्षणीं ध्वजाच्या ह्याची । शालिवाहनानें साचीं
उडविलीं शकांचीं शकलें । समरिं त्या क्षणा ३

हाणिलें हुसकितां जेथें । हूणांसि विक्रमादित्यें
हाचि घुमवि मंदोसरच्या । त्या रणांगणा ४

जइं जईं हिंदु सम्राटें । अश्वमेध केले मोठे
करित पुढति गेला हाची । विजयघोषणा ५

उगवुनी सूड हिंदूंचा । मद मर्दुनि मुस्लीमांचा
शिवराय रायगडिं करिती । वीर पूजना ६

ध्वज हाचि धरुनि दिल्लीला । वीर-बाहु भाऊ गेला
मुसलमीन तक्ता फोडी । हाणुनी घणा ७

पुढति नेम कांहीं ढळला । ध्वज जरी करांतुनि गळला
उचलुं या पुनरपि प्राणा । लावुनी पणा ८

रत्नागिरी, १९३८

## ६० सुतक युगांचें फिटलें

**परिचय**—रत्नागिरीच्या जुन्यांतील जुन्या श्रीविठ्ठलमंदिरांत प्रथमच भरसभेंत पहिला पूर्वास्पृश्य ज्या दिवशीं प्रवेश करूं शकला त्या प्रसंगीं हें पद म्हटलें गेलें. शिवू भंगी नांवाच्या एका भंग्याच्या मुलानें हें पद सभामंडपाच्या शेवटच्या पायरीवर सभेच्या अनुज्ञेनें म्हणण्यास आरंभ केला. त्याचे ते करुणमधुर आलाप आणि साभिनय विनंति ऐकत ती तीन एक हजार लोकांची सभा इतकी रिझत चालली कीं, पायरीमागून पायरी चढण्याची अनुज्ञा मिळतां मिळतां पद संपेतों तो भंगी कुमार विठ्ठलाच्या सभामंडपांत येऊन टाळ्यांच्या गजरांत उभा राहिला! अस्पृश्यतेचा नि देव-मंदिरांत पूर्वास्पृश्यांस मज्जाव करण्याचा अन्याय दूर केल्याविषयीं स्पृश्यांचे आभार मानण्याचा जरी पदाचा उत्तान अर्थ आहे तरी त्या आभारांपेक्षां जो घोर अन्याय आजवर चालूं शकला त्याचाच प्रच्छन्न निषेध त्यांत तीव्रतेनें ध्वनित होत आहे.

[ चाल : अजि अक्रुर हा नेतो०

तुम्हि देवाच्या येउं दिलेंती दारीं
आभार जाहले भारी ॥ ध्रु० ॥

तुम्हि वरदानीं शिवुनि पतित हा माथा
मळविलें पावना हाता

या ठेवुं पदांवरति पवित्रां ताता
दिधलाति पतित हा माथा

तुम्हि धर्माचे सूर्य कथुं किती नवला
सांवली तमाची शिवला

जे गांव-बहिष्कार्य आंत त्यां आणी
बाहेर गांव जावोनी

तुम्हि हिंदू या जवळ हिंदुसी आजी
केलेंत अहिंदूहुनि जी

हे सुतक युगांचें सुटले
विधिलिखित विटाळहि फिटले
जन्मांचें भांडण मिटलें
शत्रूंचें जाळें तुटलें

अम्हि शतकांचे दास : आज सहकारी
आभार जाहले भारी !

रत्नागिरी, १९२९

## ६१ संत रोहिदास

**परिचय**—रत्नागिरी येथील ‘ अखिल हिंदु ’ मेळ्यासाठीं रचलेलें गाणें.

[ चाल : पडला अभिमन्यू०

संत रोहिदास । रोहिदास संत
जयासी भेटे भगवंत ॥ ध्रु० ॥

जातिचा हिंदू ! हिंदू चांभार
मनाचा प्रेमळ अनिवार

नित्यकर्म त्याचें । त्याचें शिवण्याचें
वहाणा जोडहि जोड्यांचे

त्यावरि चालवि तो । चालवि संसारा
मनीं दे मत्सरा न थारा

शिवुनिया देई । देइ दान भक्ता
वहाणा अनवाणी त्या त्या

स्नान करी घेई । घेई तो वाचे
गोड तें नाम विठोबाचें

पूजेचा होता । होता जो बाण
शालिग्राम दिव्य जाण

त्यासि तो ठेवी । ठेवि कातड्याच्या
करुनिया संपुष्टा साच्या

आसनही त्याचें । त्याचें चर्माचें
बसे बा भक्तिभरें नाचे

संत रोहिदास । रोहिदास संत
जयासी भेटे भगवंत

२

त्यासि लोक हंसुनी । हंसुनि बोलती ते
कातडें अशुद्ध त्यामध्यें

देवमूर्ति कैशी । कैशी ठेवावी
कां न ती विटाळली जावी

त्यांसि संत वदला । वदला प्रिय वाचा
बोलतों अर्थ करा याचा

कातड्यामध्यें । मध्यें गर्भाच्या
बैसला मनुष्य मातेच्या

आइ दे दूध । दूध गात गाणीं
स्तनाच्या चर्मकुप्यांतूनी

मुख हें मढवीलें । मढवीलें देवें
कातड्यानेंच काय नोहे

मढविले हात । हातपाय आणी
प्राणही चर्मे देवांनीं

ऋषि मुनी बसती । बसति तपस्येसी
घेति मृगचर्म आसनासी

आणि व्याघ्रचर्म । चर्म आवडीनें
उपरणें केलें सांबानें

सांब सदाशिवजी । शिवजी ज्यां शिवती
चर्में अशुद्ध कैशीं तीं

अशुद्ध ना चर्म । चर्म न चांभार
तयाचा तोची अधिकार

अधिकारी साचा । साचा जो भक्त
मांग वा महार वा शाक्त

प्रेमचि अधिकारा । अधिकारा भक्ती
देतसे नाम-भजन मुक्ती

असे हिंदुधर्म । धर्म विठ्ठलाचा
सनातन सकलां कथि साचा

चित्ताचा शुद्ध । शुद्ध तोचि होतो
जातिचा असो कुण्याही तो

अशुद्ध जरि चित्त । चित्त तरी तो तो
ब्राह्मणहि अस्पृश्यचि होतो
क्षत्रियहि अस्पृश्यचि होतो

महार तो चोखा । चोखामेळ्याला
आलिंगिता देव झाला

झाला सजणासी । सजण कसायासी
प्रसन्नचि परमेश्वर त्यासी

धंदा हा सारा । सारा उपकारी
त्याविण न चले संसारीं

म्हणुनिया कोणीं । कोणीं कर्माचा
विटाळ न मानावा साचा
कथी हिंदुधर्म । धर्म विठ्ठलाचा
आमुच्या वाडवडीलांचा
तुम्हि अम्ही हिंदू । हिंदू जातीचे
सर्वही भक्त विठ्ठलाचे
रक्षुं हिंदुधर्म । धर्म विठ्ठलाचा
आमुच्या वाडवडीलांचा
असें रोहिदास । रोहिदास संत
वदे त्या भेटे भगवंत !

रत्नागिरी

## ६२ पाण्यांतली आग ती !

[ शार्दूलविक्रीडित

माते, अद्भुत हें पहा, भडकले पाण्यांतुनी जाळ ते
सत्ता घे छिनुनी बळेंचि तव जो त्याच्या बळा जाळते
बंदीमाजि तुवां छळांसि सहतां जे ढाळिलेसी अहा
अश्रू घेउनि पेट तेचि उठती जाळूं छळा त्या पहा
बंदीगेहचि आंतुनी भडकवी पाण्यांतली आग ती
फांशीचे जळण्या, उडोनि ठिणग्या, ते खांबही लागती
क्रोधाचा ज्वर जो भरे तुज, न तो साहोनि उत्ताप हा
बेड्याची तव लागताति वितळूं आगींत अंतीं पहा
कांहीं काळ अशींच गाळ तरि तूं उत्तप्त हीं आंसवें
कांहीं काळ असाच शोक करिं तूं, सोशी न जें सोसवें
जों जों पुष्टविशील आग असली अश्रूंसि ढाळूनिया
तों तों टाकिल ती छळासि छळकासंगेंचि जाळूनिया

## ६३ परगांवीं जातांना

[ शार्दूलविक्रीडित

भक्तीनें भजतां तुझ्याच करिसी तूं भक्त देवास या
सिंहासी हरिणीच लोचनशरें जिंकी विमोहूनिया
होती ठाउक काल ना, न करमे आजी मला तीविना
जाई जाइ तशी तुझी तनुलता वेढूनि माझ्या मना

स्वप्नीं पालविसी तरीहि परिसूं जागेपणीं ये मला
देतां 'एकचि' दे अनेक मजसी घेऊं मुके प्रेमला
घेतां घट्ट मिठींतही, न जवळी भासे पुरेशी ! परी
जातां दूर खरीच आज विरहा सोसूं कसा मी तरी !

केव्हां हांसत तूं समुत्सुक पुन्हा येशील भेटूं अशी
आतां तूं शकशील का तरि पुन्हा भेटीस येऊं मशी
जाणें भागचि ! जा सखे ! परि पुन्हा येशील भेटूं जधीं
प्रीतीची परतूनि ठेव मज दे ही वाढवूनी हृदीं

## ६४ हिंदुजातीचा श्रीपतितपावनाचा धावा

**परिचय**—रत्नागिरीस श्रीपतितपावनमंदिराचा देवप्रतिष्ठेचा अभूतपूर्व असा उद्घाटनसमारंभ झाला. त्यावेळीं मुख्य सभेंत हें पद म्हटलें गेलें. हिंदुस्थानांतही अपूर्व असणाऱ्या त्या अखिल-हिंदुमंदिरांत ब्राह्मणक्षत्रियांपासून महार भंगी प्रभृतीपर्यंतच्या समस्त हिंदुबंधूंचा तो पांच हजारांवर सरमिसळ दाटलेला समाज, महाराष्ट्रां-तील अनेक पुढारी, संत, महंतांसुद्धां शंकराचार्य डॉ. कुर्तकोटींच्या अध्यक्षतेखालीं हिंदुमात्रास वेदोक्ताचा नि देवपूजेचा समान अधि-कार नुसत्या शब्दांनींच नव्हे तर प्रत्यक्ष आचरणांत तिथल्या तिथेंच देत असणारें तें दृश्य, रत्नागिरीस तरी दोन तीन हजार वर्षांत पूर्वीं कुणीं पाहिलेलें नसेल. त्याकाळी ती एक समाजक्रांतीची चळवळ म्हणूनच गाजली. त्या समयीं भंगी, महार, मराठे, ब्राह्मण, वैश्य प्रभृति जातींच्या वीस निवडक तरुण कुमारींनीं सरमिसळ उभे राहून एककंठानें या अखिल हिंदु धाव्याचें मंगलाचरण गाइलें होतें.

[ चाल : अजि अक्रुर हा नेतो०

उद्धरिसी गा हिंदुजातिसी केव्हां
हे हिंदुजातिच्या देवा ॥ ध्रु० ॥

आब्राह्मण चंडाल पतितची आम्ही[1]
तुम्हि पतितपावन स्वामी
निजशीर्ष विटाळेल म्हणुनि कापाया[2]
चुकलों न आपुल्यां पाया

---

१ केवळ अस्पृश्यांनाच पतित म्हणून काय उपयोग ? खरें पाहतां हें हिंदुराष्ट्रचें राष्ट्रच पतित झालेलें आहे ! २ हिंदुसमाजपुरुषाच्या विराट देहाचें 'ब्राह्मण' शीर्ष म्हणून कल्पिलें. पण मस्तकानें आपणास पायाचा विटाळ होईल म्हणून पाय कापून टाकावे, तसाच मूर्खपणा शूद्रांस जन्मतःच नित्याचे दूर लोटून शरीरसंबंध आमूलाग्र तोडण्यांत केला.

अणि पायांनीं राखुं शुद्धता साची
छाटिलें पावलांनाची[1]

ऐकूं न पडो आपुलिया कानांतें
मुख[2] कथि न म्हणुनि ज्ञानातें

निज सव्यकरें वामकरा जिंकाया
विकियली शत्रुला[3] काया

करुं, बंधूंसी बंद करूं दारा, जे
चोर ते घराचे राजे

हें पाप भयंकर झालें। रे
पेरिलें फळाला आलें। रे
हृदिं असह सलति ते भाले। रे

उद्धार अतां! मृत्युदंड कीं दे वा
हे हिंदुजातिच्या देवा! १

अनुताप परी जाळितसे या पापा
दे तरी आजि उःशापा

---

१ बरें, स्पृश्यांव्यतिरिक्त हिंदु तरी एकजाति, एकजीव राहिले म्हणावें, तर तेंही नाहीं. शूद्रांनींही विटाळ होतो म्हणून अतिशूद्रांस 'अस्पृश्य' मानलें, शरीरसंबंध साफ तोडला, पायांनीं स्वतःस विटाळ होईल म्हणून स्वतःच्याच पावलांना छाटलें! २ "ब्राह्मणोस्य मुखमासीत्"! पण ज्यांना ज्ञान सांगण्यासाठीं ते 'मुख' झाले, त्या श्रोत्यांना–त्या कानांनाच–त्या मुखानें वेदादि पवित्र नांव सांगण्याचें नाकारलें! असा सर्व प्रकारें देहाचा देहानेंच शरीरसंबंधविच्छेद चालविला. अवयवानें अवयव छाटले. ३ तीच गोष्ट क्षत्रियांची. जयचंदानें पृथ्वीराजास जिंकण्यासाठीं महंमद घोरीला आपलें स्वातंत्र्य विकून टाकिलें. उजव्या हातानें डाव्या हाताची ऐट उतरविण्यासाठीं आपल्या साऱ्या देहालाच दुसऱ्याचे हातीं दिलें. पण त्यासरशीं आपणही लुले पडत आहोंत हें लक्षांत येईना!

निर्दाळुनि त्या आजि भेद-दैत्याशी
ये हिंदुजाति तुजपाशीं

ते अवयव विच्छिन्न सांधिले[1] आजी
तूं फुंकिं जीव त्यामाजी

देऊनि बळा वामनासि या काळीं
तो घाल बळी पाताळीं

जरि शस्त्र खुळा कर न आमुचा कवळी
परि तुझी गदा तुजवळी

जरि करिशि म्हणूं जें आतां । रे
म्हणशील करूं तें नाथा । रे
उठुं आम्हि परी दे हाता । रे

दिधलासि जसा कंस मारिला तेव्हां
हे हिंदुजातिच्या देवा ! २

रत्नागिरी, १९३१

---

१ ज्या जन्मजात जातिभेदाच्या दैत्यानें समाजाचीं शकलें केलीं तो भेददैत्य निर्दाळण्यास्तव आज सगळ्या जाती एका "हिंदुजातींत" एकत्रटून एकजीव होऊन हिंदुत्वाचे वेदोक्तादि समसमान संस्कार आचरीत इथें आम्ही उभे आहोंत. आतां पुढचें महत्कार्य तेंहि करण्यास शक्ति दे, साधन दे.

## ६५ मला देवाचें दर्शन घेउं द्या

**परिचय**—रत्नागिरीचे किल्ल्यावरील श्रीमंत कीरशेटजींचें प्रसिद्ध भागेश्वरमंदिर पूर्वास्पृश्यांस उघडलें. त्या समारंभांत देवाच्या पूजेसाठीं पूर्वास्पृश्यांस वाटणारी तळमळ व्यक्तविणारें विनायकरावांनीं रचलेलें हें पद पूर्वास्पृश्यांच्या वतीनें भंग्यांच्या दोघी मुलींनीं म्हटलें.

[ चाल : सुनो सुनोजी०

मला देवाचें दर्शन घेउं द्या !
डोळे भरुन देवास मला पाहुं द्या ॥ ध्रु० ॥

जो तुम्हिच करा दिनरात
मळ काढित मळले हात
म्हणुनीच विमल हृदयांत—
हृदय त्या वाहुं द्या ! १

मी तहान जल तो जाण
मी कुडि माझा तो प्राण
मी भक्त नि तो भगवान—
चरण त्याचे शिवुं द्या २

तो हिंदु-देव मी हिंदु
मी दीन तो दया-सिंधु
तुम्हि माझे धर्माचे बंधु—
अडवुं नका जाऊं द्या ३

रत्नागिरी, १९३१

## ६६ मथुरेस जातांना

[ चाल : अजि अक्रुर हा०

तव संगतिच्या गोकुलासि गे बाले
 सोडणें प्राप्त कीं झालें

हा कंसाचा क्रूर दूत बघ ठेला
 अजि नेत अम्हां मथुरेला

कंसासि अम्ही, कंस अम्हां वा मारी
 रणघाइ अशी होणारी

हा हाय ! क्वचित् शेवटलीची आजी
 ही भेट तुझी नी माझी

  लाडके म्हणुनि या कालीं । गे
  विरहाच्या व्याकुळ बोलीं । गे
  अश्रूंच्या रचुनी ओळी । गे

त्वां दिधलेल्या देइ प्रीतिदानाची
 पावती प्रिये ही साची !

## ६७ तनुवेल

[ चाल : घनश्यामसुंदारा०

सकाळींच तूं तोडित असतां जाईजुइच्या फुलां
माडीवरुनी सुंदर कन्ये, पाहियली मीं तुला

उंचवितां कर छातीवरि ये चोळी तटतटुनी
कुरळ केश रुळताति गोरट्या मानेवरि सुटुनी

पदर खोवले पातळ गेलें कटितटिला लगटुनी
स्मृति सखये तव मनीं माझिया संगतिच्या उठुनी

बघसि चोरटें मी तुज दिसतों वरती कां कुठुनी
दिसतांची मी हंसूं उपेसम मुखिं तव ये फुटुनी

अशी सकाळीं फुलें तोडितां पाहियली जैं तुला
फुलवेलीहुनि तनुवेलचि तव मोहक दिसली मला !

## ६८ शस्त्रगीत

**परिचय**—शस्त्रनिर्बंध रद्द करण्याची मागणी करण्यासाठीं पुण्यास विद्यार्थ्यांनीं मोठी मिरवणूक काढली तेव्हां त्यांच्यासाठीं विनायकरावांनीं हें पद रचलें.

[ चाल : चामरवृत्तासारखी

व्याघ्र-नक्र-सर्प-सिंह-हिंस्र-जीव-संगरीं
शस्त्रशक्तिनें मनुष्य हा जगे धरेवरी

रामचंद्र चापपाणि चक्रपाणि श्रीहरी
आर्तरक्षणार्थ घेति शस्त्र देवही करीं

शस्त्र पाप ना स्वयेंचि, शस्त्र पुण्य ना स्वयें
इष्टता अनिष्टताहि त्यास हेतुनेंच ये

राष्ट्ररक्षणार्थ शस्त्र धर्म्य मानितें जरी
आंग्ल जर्मनी जपान राष्ट्र राष्ट्र भूवरी

भारतांतची स्वदेशरक्षणार्थ कां तरी
शस्त्र-धारणीं बळेंचि बंध हा अम्हांवरी ?

शस्त्र-बंधनें करा समस्त नष्ट या क्षणा
शस्त्र-सिद्ध व्हा झणीं समर्थ आर्त-रक्षणा

व्हावया स्वदेश सर्व सिद्ध आत्मशासना
नव्या पिढीस द्या त्वरें समग्र युद्धशिक्षणा !

पुणें, १९३८

## ६९ अनंताची आरती

[ चाल : भूपाळीसारखी

निरंजनासी निरांजनाचा देवा दीप तुला
दाविती, देवा दीप तुला ॥ ध्रु० ॥

आकाशाच्या अंगणांत तव
सूर्यसहस्त्रीं जो दीपोत्सव
पाजळिती हे पणती अपुली त्यास करूं साजरा
दाविती, देवा दीप तुला १

सूर्यसहस्त्रींही जो उरला
पणतीनें तो जाई स्फुरला
नयनीं ऐसा अंधकारलेव आहे तोचि भला
दाविती, देवा दीप तुला २

आईच्याची बागेमधुनी
ताजीं ताजीं वेंचुनि वेंचुनि
मुली गुंफिती आईच्याची वेणींतूनि फुलां
दाविती, देवा दीप तुला ३

अंदमान

॥ इत्यलम् ॥

---

१ भाविक भक्ति.

# परिशिष्ट



[ छेदकाच्या आरंभींचा अंक कवितेचा क्रमांक आहे. ]

**२.** या फटक्यांत विनायकरावांचा अगदीं लहानपणीं झालेला बखरींचा परिचय ध्यानांत येतोच, पण प्रभाकराचाही पोवाडा त्यांच्या अवलोकनांत आल्याचें ओळखतां येतें. ओळ २५, लवें चे ऐवजीं सवें वाचावें.

**३.** ५७ ते ६० या चार ओळींत विनायकरावांनीं आपलें नांव चातुर्यानें गुंफलें आहे तें ठळक अक्षरांवरून ध्यानांत येईल.

**वि**श्वेश्वरि ती **ना**रायणि ही **य**महरिहर अदि सुरवरिणी

**क**र्मसिद्धिसी **दा**वो नेउनि **मो**द देति निजभक्तजनीं

**द**र अज्ञानी **र**जनी जावो **सां**ग प्रकाशो रवि थोर

**व**रावयाला **र**त्नपटाला **क**रो आर्य ते **र**ण घोर

**९.** दहावी ओळ. केसरी म्हणजे टिळकांस जी योग्यता होती ती सरांस म्हणजे सर पदवीवाल्यांस व त्यांच्या लेखणीस नव्हती असा अर्थ.

**१२.** हें भाषांतर शब्दशः नसून गोळाबेरीज आहे.

**१४.** विनायकरावांना पंतांच्या आर्या लहानपणापासून आवडत असत. त्यांचे यमककौशल्याचें अनुकरण त्यांनीं किती हव्यासानें व अभ्यासानें केलें आहे, याचें प्रत्यंतर या आर्यावरून ध्यानीं येईल.

**१७.** या कवितेचा लेखनकाल १९०१ आहे. १९०० नव्हे.

**२०.** विनायकरावांची आर्यारचनेंतील प्रगति व सामाजिक मतांतील उदारता या कवितेवरून अजमावितां येते. ओळ ९८, विरहज्वाला वाचावें.

**२१.** मेळ्यांसाठीं विनायकराव अनेक कवनें करून देत असत; त्यांतलें वानगी म्हणून हें कवन घेतलें आहे. हें गोविंद कवीचें नाहीं. विनायकरावांचेंच आहे.

**२२.** स्त्रियांनीं विनंति केल्यावरून त्यांचेसाठीं हें गीत रचलें होतें.

**२३.** हा पोवाडा ११-११-१९११ चे सरकारी पत्रकान्वयें आक्षिप्त ठरविला

गेला होता, परंतु त्याचेवरची बंदी ७-१०-१९३८ चे सरकारी पत्रकानें उठली. पान ५०, ओळ १, प्रदीप्त वाचावें.

२४. या कवितेच्या आणखी ६ ओळी विनायकरावांस नंतर आठवल्या त्या खालीं दिल्या आहेत. त्या 'आकाशाच्या ग्रंथसंग्रहालयासि अर्पियला' या ओळीचें आधीं वाचाव्या. पान ५४, १२ वे चौकांत सूडे ऐवजीं सूड वाचावें.

नरकपतीचा हल्ला आला चितोडनगराला
देवांनाही स्वर्गी जलदिनें वर्दी धायाला
सिद्धाग्नींतुनि फर्कन ज्वाला-लोळ नभीं उठती
चितोडगडवासिनी देवि तों त्यावरि आरुढती
ज्वालारूढा देवि दुरुनि त्या चमकति तेजबळें
तयांचि तारे म्हणुनि ज्योतिषी भले भले चकले.

२५. पृष्ठ ६४ वर 'लंडन, १९०६' हें चुकून छापलें गेलें आहे. कवितेचा लेखनकाल कवितेच्या शेवटीं दिला आहे तोच बहुतेक बरोबर असावा. कवितेच्या पहिल्या ओळींत द्युति वाचावें.

२६. ओळ २, उपनिषत् वाचावें.

२९. पान ७२, ओळ ९, मिरवीते वाचावें.

३५. ओळ ६३, मंगला वाचावें.

३७. गोमांतक काव्याचा पूर्वार्ध लिहून झाल्यावर २० मात्रांच्या चरणाची योजना धावत्या तऱ्हेनें करण्याचें विनायकरावांनीं योजिलें. त्याला वैनायकवृत्त असें निराळें नांवही दिलें. सायंघंटा, निद्रे व मूर्ति दुजी ती इत्यादि कवितांतून त्यांनीं तें प्रथमच वापरून पाहिलें असावें असें दिसतें. पान ९९, ओळ ७२, विरहत वाचावें.

३९. ओळ १९, ओळ ३५ व ओळ ४९ येथें छेदक संपत आहेत. ओळ ४१, का ऐवजीं कीं वाचावें.

४०. बंदीगृहांत शिक्षा म्हणून घातलेली बेडी साफच कां करावी, म्हणून पुष्कळ वेळां वैतागून बंदी बेडी साफ करणें सोडून देतात. आणि शिक्षेच्या बेडीचें लालनपालन केलें नाहीं—साफ केली नाहीं म्हणून बंदीपाकडून दुसरी शिक्षा खावी लागते. त्यावांचून शेवटीं साफ न केली तर ती बेडी गंजून स्वतःच्या

पायाला अधिकच रुपूं लागते म्हणजे शत्रूनें दिलेल्या एकपट शिक्षेस नीट कुरवाळून घेतलें नाहीं तर स्वतःस चौपट शिक्षा स्वतःकरवींच देऊन घ्यावी लागते. म्हणून शेवटीं शिक्षेच्या बेडीलाच एकाद्या अलंकाराप्रमाणेंच घांसून पुसून झक्क ठेवणें भाग पडतें. या विरोधाभासावरून अर्थातच या जगाच्या " इच्छेच्या " पायांतील त्या मूळ बेडीची त्या " विधिनिषेधीय बेडीची " धर्माधर्माची आठवण होई. ही लोखंडी बेडी त्या मूळ बेडीची केवळ एक आंशिक कडी आहे. ती धर्माधर्माच्या बेडीची इच्छास्वातंत्र्यास झालेली शिक्षाही अशाच कारणास्तव कुरवाळीत बसावें लागतें. ती 'विधिनिषेधांची' बेडीही उलट घांसून पुसून ठेवावी लागते. नाहीं तर अधिकच दुःख होतें. या विचारपरंपरेच्या ओघानेंच पुढील प्रश्न उठतो. ही विधिनिषेधांची मूळ शृंखला कोणीं घडली? इच्छेच्या पायांत ती कोणीं घातली? तें कोणीं सांगावें! विधिनिषेधाच्या शृंखला ज्यांनीं घडल्या त्यांच्या इच्छेनें त्या धर्माधर्माच्या बेड्या आमच्या मानवी इच्छेच्या पायांत घातल्या असतील, किंवा त्याच्या त्या इच्छेच्या पायांतही आणखी एकादी इच्छा बेडी होऊन पडली नसेल म्हणून कशावरून? कीं जिच्यायोगें निसर्गनियमांच्या बेडीनें जखडलेल्या त्याच्या इच्छेला आमच्या इच्छेच्या पायांत ही विधिनिषेधांची बेडी अडकविणें भाग पडलें? असे हे बंदीगृहांत उठणारे विचारतरंग या कवितेंत गोंवले आहेत.

४१. बंदीगृहांतील कोठडीस प्रत्येक बंदी, तिच्यांत रहाणेंच भाग पडल्यामुळें झाडून झुडून साफ ठेवूं लागतो. प्रथम बंदीगृहाचा नियम म्हणून झाडतो. पुढें पुढें अगदीं स्वतःच्या स्वच्छतेची हौस म्हणून वर्षानुवर्षांच्या सहवासानें ती कोठडी अगदीं ममत्वानें साफ करीत इतरांबरोबर स्पर्धा करूं लागतो, कीं माझीं जास्त साफ कीं तुझी! अशा वेळीं ती कोठडी साफ करण्यांत गुंतले असतां मनांत जे विचारतरंग उठत ते ह्या कवितेंत गोंविले आहेत. शंका मनास विचारी, कीं ही कोठडी फोडावी कीं ती उलटी लिंपोत सुटावें! पण शंकेस बुद्धि उत्तर देई कीं, कोठडी हें जसें बंदीगृह तसेंच हा देहही एक बंदीगृहच आहे; पण तें आपण झाडतों पुसतोंच कीं नाहीं? दुसरें, 'मुक्तताच' म्हणाल तर तिचा व्याप बंधाचे विस्तीर्णतेप्रमाणें वाढतच जातो. ती मुक्तता नुसती ही भौतिक एकलकोंडी फोडून कशी मिळणार? तिच्यापुढें

बंदीगृहाचे दगडी तट, आणि मानसिक इच्छाक्षितिजाचे – तृष्णेचे तट! पूर्ण मुक्तता कोठें आहे? शंका पुन्हा म्हणे, पण ते "जीवन्मुक्त" कोण तर मग? त्यांनीं चित्तवृत्तींच्या क्षितिजांना ओलांडून पूर्ण मुक्ति मिळविली नाहीं का? त्यावर उलट उत्तर येई कीं, त्याच्या मरणानंतर आत्म्याचा भाव काय झाला तो फारतर त्यांचा त्यांना ठाऊक; पण जीवन्मुक्त जिवंत होते तोंवर त्या वेदान्तिक कुलालचक्राच्या पूर्वगतीपुरतें कां होईना पण बंधनां-तच असलेले दिसत तरी होते. 'उषेच्या' म्हणजे जन्मप्रभवाच्या आणि 'सांजेच्या' म्हणजे मरण-प्रलयाच्या रंगानें चित्रिलेल्या या 'मी'च्या म्हणजे अहंकारी व्यक्तित्वाच्या आकाशांत असूं-हसूंचे सुखदुःखाचे जे हलगे ठोकलेले आहेत त्यांना बांधलेल्या वृत्तींच्या झोंपाळ्यावरच त्यांना सुखदुःखाचे झोके घेत पहात होतों! या जीवनांत जीवनमुक्तही पूर्ण मुक्तसे दिसत नाहींत. श्रीकृष्ण क्रुद्ध होत; पार्थाची जयद्रथवधाची प्रतिज्ञा पुरी कशी होईल म्हणून रात्रभर तळमळत पडत. बुद्धांचें पोट दुखे. रामकृष्णांना भुकेनें रडकुंडी केलें; रामकृष्ण त्यांचे शिष्ययुवक दिसले नाहीत म्हणून शोक करीत! तुकाराम पंढरीचे वाटेवर रडत बसत. चैतन्यानें 'हे प्रिया हे प्रिया' करीत रानोमाळ भटकत समुद्राचा नीलश्यामल रंग पाहून तोच घनश्याम म्हणून त्यांत उडी घेऊन देहत्याग केला!

४६. मुखपृष्ठावरील रंगित चित्र या कवितेंतील कथाभागाचें आहे. मेघदूतांतील यक्षसंदेशाचे व भागवतांतील रुक्मिणीपत्रिकेचे धर्तीवर हें काव्य रचलें असून त्यांत एका शापित गरुडकन्येनें आपलें प्रेमपूर्ण मनोगत नारदाचे बरोबर आपल्या विजयी प्रियकरास कळविलें आहे. तिचे आईबाप स्वकुलाच्या थोरवीची जाणीव शापामुळें विसरतात, पण गरुडकन्या मात्र ती विसरूं शकत नाहीं. भारतीय जनतेची गेली पिढी आपली महनीयता जरी किंचित् काल विसरली तरी भावी पिढी मात्र ती विसरूं शकणार नाहीं हा ध्वनि तर या काव्यांत नसेल ना? श्लोक ७, ओळ १, कीटकां वाचावें. श्लोक ४२, ओळ ४, प्रभुकरिं वाचावें.

५१. हें काव्य वैनायकवृत्तांत रचलें असलें तरी १०।१० ओळींचे विलग स्तबकांनीं तें गुंफलें आहे.

५२. ता. ४-५-१७५८ दिवशीं रघुनाथराव पेशव्यांस लिहितात: लाहोर, मुलतान, काश्मीर वगैरे अटके अलीकडील सुभ्यांचा बंदोबस्त करून अंमल बसवावा, त्यास कांहीं जाला, कांहीं होणें तोही लवकरच करितों. तयमूर सुलतान व जहानखान यांचा पाठलाग करून फौज लुटून घेतली. थोडीशी झडत पडत अटकेपार पिशावरास ते पोंचले. अब्दाली इराणवर चालून गेला, त्याची फौज इराणच्या पातशहानें लुटून घेतली. अब्दाली कंदाहारास आला, इराण्याची फौज पाठलाग करीत आली आहे. जबरदस्तखान व मुकर्रबखान या प्रांतीचे सरदार व जमीनदार अब्दालीचे जबरदस्तीमुळें त्यास रुजू होते, तेहीं बदलोन हंगामा करितात. हल्लीं रफीक होऊन सेवा करून दाखवूं, अब्दालीस तंबी करूं, ऐशा त्यांच्या अर्ज्या आल्या आहेत. अब्दालीचा धर सुटला आहे. सारांश त्याचा जोर तिकडून होतो ऐसे नाहीं. तिकडून इराणचे शहानें जेरदस्त केलें. इकडून जोरा पोंचवून सरकारचा अंमल अटकेपार करावा. त्याचा पुतण्या व दौलतेचा वारस स्वामीपाशीं देशास आला. तो स्वामींनीं आम्हाकडे पाठविला होता. त्यास अटके अलिकडे थोडीशी जागा बसावयास देऊन अटकेपार काबूल पिशावरचा सुभा देवूं. अब्दालीच्या फौजेवर अब्दुल समरखान सरहिंदेंत होता तो सरकारात पाडाव आहे. तो व आणखी या प्रांतीची फौज, इराणी मोगल देऊन मशार-निल्हेची रवानगी करितो. हे तिकडील पैरवी करतील. स्वामीचे पुण्यप्रतापें अब्दालीस जोरा पोंचवून तंबी करतील, पारिपत्य उत्तम प्रकारें करून अटकेपार अंमल बसवितील. लाहोर प्रांतीं रेणको अनाजी व रायाजी सखदेव ऐसे ठेविले. गोपाळराव गणेश यांचाहि पैगाम आहे, तेही राहतील. इराणचे पातशहाचे स्वदस्तुरचे कागदही आम्हास व मल्हाररावास आले होते, कीं लौकर कंदाहारेस यावें, आणि त्याचें पारिपत्य करून अटकेची हद्द करावी. परंतु आम्हीतरी काबूलचा सुभा, अब्दुल रहिमखान स्वामींनीं पाठविला, त्यास देतो. फौज वगैरे थोडेबहुत साहित्यही करितो. काबूल व कंधार हे अटकेपारचे सुभे हिंदुस्थानाकडे अकबरापासून अलमगीरपावेतो होते ते आम्ही विलायतेत कां द्यावे? यास्तव तूर्त येथें सुभे देतो. त्यांसही (इराणचे शहास) या सुभ्यांची दरकार नसेल. तो इराणचा अंमल करील. आम्ही कंदारपावेतो अंमल बसवून तूर्त त्यास गोडच जाब पाठविणार आहो. जंबू, काश्मीर

वगैरे तमाम वकील आले आहेत. मामलत थोडीबहुत अटके अलिकडील करीत आहों. पलीकडील तूर्त होत नाहीं. खटपट मात्र होईल. तूर्त तातडी-मुळें जें होईल तें करितो. पुढील स्वारीत जो कोणी सरदार मातबर येईल तो बंदोबस्त करील. मुलुख दोंचौ करोडीचा वसुली, परंतु जमीनदार मवास मोठमोठे आहेत. आम्ही नावास मात्र खंडणी करितो. जेथें २५ लक्षांचा मुलुख तेथें १–२ लक्ष देणेंच कठीण आहे. तूर्त माघारे फिरावयाचा डौल स्वामीचे आज्ञेवरून धरिला आहे. याजमुळें जे होते तेच करितो, तरी लावीत नाहीं. तूर्त अदिनाबेगावरच सारा याख्तकार दिल्हा आहे. त्यासच कमाविसानें लाहोर मुलतान दिल्हे आहे. यंदां तर सारे शिबंदी खालेच जाईल. शिबंदी वारताच कठीण पडेल. २–३ वर्षानीं कांहीं सोईस लागेल. स्वामींस कळावे.

हिंदूंचे सेनापति श्रीमंत रघुनाथराव यांनीं लाहोरवर आक्रमण करून ती घेतल्याचें वृत्त कळल्यावर अंताजी मणकेश्वर ह्यांनीं जें त्यावेळीं पत्र लिहिलें आहे तें—

अंताजी माणकेश्वर लिहितो:—सेवकास स्वामींनीं कृपाकरून पत्र (१८ एप्रीलचें) पाठविलें तें पावलें. वर्तमान लाहोरच्या फत्तेचे, शत्रूचे पारिपत्याचे व तिकडील मुलूख काबीज केल्याचे लिहिले ते सविस्तर वाचून परम आनंद झाला तो पत्री कोठवरी लिहावा. हिंदुस्तानांत कीर्त, लौकिक मातबर जाली. कुल राजे, उमराव, सुभे यांस दहशत पडली. सारे हिंदुस्तानचा सूड अब्दालीपासून एक स्वामींनीं घेतला. तेणेकरून यशाचे पर्वत झाले. स्वामी यशस्वीच आहेत. याचा विस्तार सेवकास लेखन करावयास सामर्थ्य कैचे. वर्तमान वजिरांनीं ऐकोन बहुतच हर्ष मानिला. स्वामी अवतारी पुरुष आहेत. त्यांची स्तुति मनुष्यांनीं काय करावी. जरी स्वामींची छावणी लाहोर प्रांती जाली तरी वजीर पातशहास घेऊन छावणी आपल्याजवळ घेऊन येतो.

१ जुलै १७९२ रोजीं निजामाजवळचा पेशव्यांचा वकील गोविंदराव काळे यानें नाना फडणीसास पत्र लिहिलें आहे. त्यांत 'अटक नदीचे अलीकडे दक्षिण समुद्रपावेतों हिंदूंचें स्थान, तुरुकस्थान नव्हे' हे महत्त्वाचे

शब्द आले आहेत. हें सर्वच पत्र अत्यंत वाचनीय आहे. पत्र पुढील काळांतील असलें तरी हिंदु मुत्सद्द्यांचे मनांत कोणते विचार घोळत होते हें त्यावरून स्पष्ट होतें.

५५. ओळ १४, पूजनें वाचावें.

५९. या गीताखालीं घातलेलें स्थल व काल शंकास्पद आहेत.

६२. ओळ १०, सोशीं न जें सोसवे, वाचावें.

६९. ही आरती गोमांतक काव्याचे पूर्वार्धांत आली आहे.

---

# सावरकरकाव्य-समालोचन

संपादक

## वासुदेव गोविंद मायदेव

| विषय | लेखक |
|---|---|
| १ सावरकरांच्या काव्यनिर्मितीचा इतिहास | प्रो. वा. गो. मायदेव, एम्.ए. |
| २ स्वातंत्र्यशाहीर सावरकर | कवि साधुदास |
| ३ महाराष्ट्रभाट सावरकर | य. न. केळकर, बी. ए. |
| ४ कमला व विरहोच्छ्वास | प्रो. शं. के. कानेटकर, एम्. ए. |
| ५ गोमांतक काव्याची ऐतिहासिक पार्श्वभूमि | अ. का. प्रियोळकर, बी. ए. |
| ६ गोमांतक ( काव्य ) | प्रो. रा. श्री. जोग, एम्. ए. |
| ७ तारकांस पाहून ( रसग्रहण ) | अनंत काणेकर, बी.ए.,एल्एल्.बी. |
| ८ सावरकरांचीं दीर्घकाव्यें | प्रो. श्री. शं. खानवेलकर, एम्. ए. |
| ९ भारतीय काव्यवाटिकेंत सावरकर-कवितेचें स्थान | साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास |
| १० सावरकरांचें काव्य आणि त्यांतील तत्त्वज्ञान | दाजी नागेश आपटे, बी. ए., एल्एल्. बी. |
| ११ सावरकर-काव्याचा पद्य-रचनादृष्ट्या विचार | ना. ग. जोशी, एम्. ए. |
| १२ सावरकरांचीं स्फुटकाव्यें | प्रो. द. के. केळकर, बी. ए. |
| १३ कवि सावरकर | प्रो. व. ना. नाईक, एम्. ए. |

पृष्ठसंख्या १९७ : मूल्य २ रुपये.

---

**केशव भिकाजी ढवळे, श्रीसमर्थ-सदन : २, मुंबई २**

---